


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास







साहित्य
कला
संस्कृति



# नवमहाराष्ट्र राज्यमहोत्सव विशेषांक

वर्ष १६ वें : मे १९६०

## श्रेयनामावलि



[illegible] आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. दीनानाथ दल[illegible] [illegible] आर्ट स्टुडियो ४०–४२ केने[illegible] [illegible] मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. [illegible]धिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध [illegible]ली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाही. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क [illegible]लाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.

अनुक्रमणिका





मंगल देशा पवित्र देशा महाराष्ट्र देशा....
प्रणाम घ्यावा माझा हा श्री महाराष्ट्र देशा....




# स्वप्न साकार झालें

महाराष्ट्राचे दुर्दिन संपले अखेर ! अनेक वर्षं मराठी भाषिकांनीं उराशीं बाळगलेलं संयुक्त महाराष्ट्राचं स्वप्न साकार झालं. शिवजयंतीच्या शुभमुहूर्तावर आज साडेतीन कोटी मराठी भाषिक एकत्र येत आहेत हा महाराष्ट्राच्या इतिहासांतील सर्वोच्च भाग्याचा महत्तम क्षण ! लोकहितवादी रानडे, आगरकर आणि टिळक यांच्या-सारख्या महान् समाजसुधारकांनीं आणि नेत्यांनीं आजच्या महा-राष्ट्राची घडण घडविली आहे. आणि त्यामुळें गेल्या चार वर्षांत, अपमानाचे, अवहेलनेचे आणि उपेक्षेचे अनेक प्रसंग आले तरी महाराष्ट्र डगमगला नाहीं, असत्याला शरण गेला नाहीं, अन्यायाशीं तडजोड करण्यास तयार झाला नाहीं.

कारण 'मोडेन पण वांकणार नाहीं' हें मराठी माणसाचें ब्रीद आहे. स्पष्टवक्तेपणा हें त्याचें भूषण आहे आणि सत्याशीं निष्ठा हें त्याचें कर्तव्य आहे. यामुळें कदाचित् इतरांच्या चढाओढींत महाराष्ट्र मागें पडला असेल; पण त्यामुळें महाराष्ट्राला फिकीर करण्याचें कारण नाहीं. [illegible]ला आपलें स्वत्व गमवायचें नाहीं. मराठ्यांनीं दिल्लीवर राज्य केलें तो इतिहास कांहीं अजून जुना झालेला नाहीं.

आणि त्यामुळेंच यापुढें आपापसांतील भेद विसरून आतां साडे-तीन कोटी मराठी जनता एकत्र येत आहे. आतां महाराष्ट्राच्या अभ्युदयासाठीं सर्वांनीं सर्वस्व पणाला लावणें हेंच मराठी माणसांचें इतिकर्तव्य. नवमहाराष्ट्राच्या पुनर्रचनेची अवघड जबाबदारी आतां आपल्यावर आहे. ज्यासाठीं अविरत आक्रोश केला तें मिळविलें आहे. आतां साऱ्यांचें लक्ष आमच्या कर्तृत्वाकडे लागलें आहे. सीमाभागांतील जनता आमच्याकडे डोळे लावून बसली आहे. गोव्याची हांक अजून बुजाली नाहीं. या साऱ्यांचें स्मरण ठेवून नव्या महाराष्ट्राला आतां पुढचीं पाऊलें टाकावयाचीं आहेत. आणि आजच्या शुभप्रसंगीं हेंच इतिहासाचें महाराष्ट्राला आव्हान आहे.

संयुक्त महाराष्ट्र साकार करण्याच्या प्रयत्नांत प्राणार्पण करणाऱ्या हुतात्म्यांपासून तों सर्व राजकीय पुढाऱ्यांना दीपावलीचें सादर अभिवादन !

—आणि शिवरायाच्या मंगल वास्तव्यानें पुनीत झालेल्या या गोविंदाग्रजांच्या 'राकट आणि कणखर देशाला' आमचे या शुभप्रसंगीं त्रिवार प्रणाम !

**दिव्य तेज गर्भ हा। बुद्धिने प्रगल्भ हा**
**शक्ति युक्तिने महा-राष्ट्र गौरवीत हा**



राजा श्रीशिवछत्रपती

कवण दूर शतकाच्या कवण्या अश्रुत दिवशीं केव्हां नाहिं ठाउकें आज
कवण मराठी शैलिं बैसलां कानन-घन-अन्धारीं प्रभु तुम्ही शिवराज
तडित्प्रभावत् एक भावना उजळित तुमच्या भाळा स्थिरावली हृदयांत
'छिन्न विखंडित क्षिप्त भारता सांधिन बांधिन एका धर्म राज्य पाशांत'
तुमच्या वज्र शिखेनें लिहिल्या त्यानंतर निंदि एका उभ्या महाराष्ट्रांत
दिगंतरांतुन युगांतराचा विद्युत् वन्हि कळेचा महामंत्र विक्रांत
प्रलयघडिस त्या ऐट मोडली मोगल–शिरपेचाची जसें गळावें पान
तरिहि न झालें हिंदभूमिला महाराष्ट्र-घोषाच्या संदेशाचें भान

— रवीन्द्रनाथ टागोर



अनुक्रमणिका

महाराष्ट्र सरकार, प्रकाशन संचालक द्वारा प्रकाशित, मुंबई



अनुक्रमणिका

# दीपावली

वैशाख शके १८८२ मे १९६०




## गर्जा महाराष्ट्र माझा

जय जय महाराष्ट्र माझा – गर्जा महाराष्ट्र माझा
रावी ते कावेरी भारतभाग्याच्या रेषा
निळे निळे आकाश झांकतें या पावनदेशा
तुंग हिमालय, विंध्य, अरवली, सह्याद्रि निलगिरी
उत्तरदक्षिण वारे पाउस वर्षविती भूवरी
रेवा वरदा, कृष्ण, कोयना, भद्रा गोदावरी
एकपणाचे भरती पाणी मातीच्या घागरी
भीमथडीच्या तट्टांना या यमुनेचे पाणी पाजा
गर्जा महाराष्ट्र माझा

भीति न आम्हा तुझी मुळीही गडगडणाऱ्या नभा
अस्मानाच्या सुलतानीला जवाब देती जिभा
सह्याद्रिचा सिंह गर्जतो शिवशंभूराजा
दरीदरींतुन नाद गुंजला महाराष्ट्र माझा
जय जय महाराष्ट्र माझा

गलमुच्छे पिळदार मिशीवर उभे रहाते लिंबू
चघळित पाने पिकली करितो दो ओठांचा चंद्रू
मर्द मराठा गडी ओढतो थंडीची गुडगुडी
ठसक्याची लावणी तशी ही ठसकदार गुलछडी
रंगरंगेला रगेल मोठा करितो रणमौजा
गर्जा महाराष्ट्र माझा

काळ्या छातीवरी कोरली अभिमानाची लेणी
पोलादी मनगटें खेळती खेळ जीवघेणी
निढळाच्या घामानें भिजला,
दारिद्र्याच्या उन्हांत शिजला
देशगौरवासाठीं झिजला
दिल्लीचेही तख्त राखतो—महाराष्ट्र माझा
जय जय महाराष्ट्र माझा

— राजा बढे


अनुक्रमणिका



# माझ्या मनांतला महाराष्ट्र

नामदार न. वि. गाडगीळ

दि. १ मे १९६० रोजीं महाराष्ट्र राज्याची स्थापना होत आहे आणि भारताच्या संविधानाप्रमाणें महाराष्ट्र हे एक घटक राज्य होणार आहे. ज्या गोष्टीसाठीं किती तरी वर्षे महाराष्ट्रांतील लोक प्रयत्न करीत होते ती घटना आतां सिद्ध झाली आहे. महानुभाव पंथीय संतांनी त्या वेळचा महाराष्ट्राचा प्रदेश किती व कोठपर्यंत आहे याचा निर्देश आपल्या लेखांतून व काव्यांतून केला आहे. पश्चिम समुद्रपट्टीपासून तेलंगणापर्यंत, उत्तरेस नर्मदेपासून दक्षिणेस तुंगभद्रेपर्यंतचा मुलूख अशी कल्पना एकेकाळीं महाराष्ट्र प्रदेशाची मानली जात होती. राष्ट्र हे भूगोल व इतिहास यांच्या संयोगानें व समन्वयानें सिद्ध होते. तोच प्रदेश पराक्रमाच्या अभावीं एकाकडून दुसऱ्याकडे जातो व इतिहास हा नवेजुने करणारा कारागीर व मोडतोड करणारा उपद्व्यापी असतो. तो श्रेष्ठ पुरुष उत्पन्न करीत असतो व श्रेष्ठ पुरुष त्याला निर्माण करीत असतात. या सर्व सिद्धांताचा अनुभव गेल्या हजार वर्षांत महाराष्ट्राला आला आहे. भूगोल तोच राहून इतिहासाच्या करणीनें महाराष्ट्राच्या दिशा कमीजास्त झाल्या आहेत. तथापि महाराष्ट्र यां कल्पनेमागें असलेले आदर्श व अस्मिता यांत गेल्या हजार वर्षांत विशेष फरक पडलेला नाहीं.

महाराष्ट्रांतील जनतेचा स्वभाव कसा आहे याचे वर्णन कित्येक शतकांपूर्वी चीनी प्रवाशानें लिहून ठेवले आहे. महाराष्ट्रीय मनुष्य ज्याला एकदां आपला मित्र म्हणेल त्याला सोडणार नाहीं व ज्याला शत्रू मानील त्याला क्षमा करणार नाहीं. दिलदार व द्वेषी, उदार व कठोर, अभिमानासाठीं सर्वस्व पणाला लावणारा, प्रसंगीं भोळा, सामान्यपणें सत्प्रवृत्त असे मराठी माणसाचे वर्णन अनेक लोकांनीं करून ठेवलेले आहे. 'आरंभ शूराः खलुदाक्षिणात्यः' हा अनुभव महाराष्ट्रीयांच्या बाबतीतहि अगदींच चूकीचा आहे असें नाहीं. आपसांतील दुही हा महाराष्ट्राला शाप आहे असे अनेक म्हणतात. व तेहि खरें आहे. आणि याचाहि अनुभव गेल्या कांहीं वर्षांत भरपूर प्रमाणांत आलेला आहे. आणि इतके असूनसुद्धां प्रसंगी सर्व भेदभाव विसरून कार्याचे महत्व जाणून सत्य निवृत्तीची उदाहरणेहि कांही केवळ अपवादात्मकच आहेत असे नव्हे. महाराष्ट्रांतील माणसांची मने भक्तीमार्गी आहेत पण त्याजबरोबर ज्यास्तींत ज्यास्त ज्ञानोपासना व कर्ममार्ग करणारे व आचरणारे मोठ्या प्रमाणांत महाराष्ट्रांत आहेत. आयुष्यभर निर्वाहापुरते घेऊन एकाग्रतेने व निष्ठेने कार्य करण्याची परंपरा महाराष्ट्राइतकी अन्य भारतीय राज्यांत दिसून येत नाहीं. ज्या निष्ठेने, ज्या त्यागाने आणि ज्या आदर्शांनीं प्रेरीत होऊन महाराष्ट्रांतील शिक्षणसंस्था कार्य करीत तीच निष्ठा सार्वजनीक जीवनांत तोच त्याग राजकारणांत, महाराष्ट्रीयांनी दाखविल्यास हिंदुस्थानभर महाराष्ट्र पसरेल असे मत उत्तर हिंदुस्थानांतील एका प्रमुख हिंदी मुत्सद्यानें काढले आहेत. तात्पर्य परिस्थितीप्रमाणें मौलीक गुण व मौलीक दुर्गुण व दोष यावर झालेले परिणाम लक्षांत घेतां आजच्या या मंगल प्रसंगीं कांहीं आत्मनिरीक्षण करणें महाराष्ट्रांतील विचारवंतांना इष्ट वाटले पाहिजे. महाराष्ट्र धर्म या शब्दाची योजना समर्थ रामदासांनीं केवळ पादपूर्णार्थ केलेली नाहीं. 'मराठा अवघा मेळवावा, महाराष्ट्रधर्म वाढवावा' हा संदेश शिवाजी महाराजांच्या काळीं जितका महत्त्वाचा होता तितका आजहि आहे. प्रौढ प्रताप शिवाजी महाराजांनी "हिंदवी स्वराज्या"ची कल्पना मांडली ती महाराष्ट्रधर्माच्या संदर्भात; पण प्रदेश निरपेक्ष अशीच मांडली. आधुनिक महाराष्ट्राला एक नैतिक ध्येय शिवाजी महाराजांनीं दिलें आहे. ते साध्य करण्याचा मार्ग समर्थांनीं सांगितला आहे. महाराष्ट्र हा 'महा' राष्ट्र व्हावयाचा तर संकुचित भावना अगर लहान लहान मनें ही सोडून देवून व्यापक व विशाल दृष्टीनें व मनानें येथून पुढें महाराष्ट्रीयांना वागले पाहिजे.

काव्याची व्याख्या, त्या त्याच कल्पना परि काव्यरचनेंत आहे. त्याचप्रमाणें राष्ट्राच्या बाबतींतहि आहे. राष्ट्रविषयक कल्पना त्याच त्या पण शासकीय रचनेमुळें संविधानाच्या विविधतेमुळें निरनिराळी परिस्थिती उत्पन्न होते. शिवप्रभूचा महाराष्ट्र, पराक्रमी वीरांचा महाराष्ट्र, ज्ञान गभस्ती

अनुक्रमणिका

नानां फडणविसांचा महाराष्ट्र हा ऐन स्वरूपांत एकच असून परिस्थितीमुळें आकारांत व आदर्शांत निराळा वाटत असला तरी हजार वर्षांच्या इतिहासाचे सूक्ष्म निरीक्षण केल्यास त्यांतील मौलीक हे एकच आहे असें आढळून येईल. तेच शरीर. त्यावर आतां पोषाख बदलला आहे. आतां डोक्यावर शिरपेंच नाहीं, अंगावर चिलखत नाहीं, हातांत ढाल तलवार नाहीं. आतां ही सर्व आयुधे व औजारे अर्थशून्य झाली आहेत. महाराष्ट्रानें आतां समयज्ञ झाले पाहिजे. समयाचा संदेश समजून घेऊन पुढें पाऊल टाकलें पाहिजे. पराक्रम अगर बुद्धीमत्ता ही जातीनिष्ट नाहीं, जन्मनिष्ठ नाहीं, ती कष्टसाध्य आहे ही आजच्या युगाची घोषणा व अनुभव आहे. समाजांतील एक चतुर्थांश भागाला पराक्रमाचा वारसा देवून एक चतुर्थांश भागाला ज्ञानाचे क्षेत्रांत मिरास करून देऊन आधुनिक समाजाची उन्नति यापुढे होणार नाहीं. जातीभेद हे आता इतिहासजमा झाले पाहिजे. मनुष्याचे मुल्यमापन त्याच्या जन्मावर न होता त्याच्या कृतीवरून झाले पाहिजे. व्यक्तिगत कर्तृत्व हेहि आजच्या जगाचे प्रमुख लक्षण नाहीं. समवायाने कार्यसिद्धी व्हावयाची आहे व व्यक्तीगत सुख अगर पराक्रम हा समाजाच्या संदर्भातच निरीक्षला पाहिजे व तशीच व तितकीच मान्यता त्याला मिळाली पाहिजे, म्हणून निराळ्या सामाजिक व राजकीय रचनेच्या अनुसंधानांत व्यक्तिगत आचरण झाले पाहिजे व अनुषंगिक अशी गुणसंपदा निर्माण झाली पाहिजे. आजच्या समतेच्या युगांत जी कांही विषमता असेल अगर राहील ती समाजाच्या दृष्टीने इष्ट व समाजाच्या प्रगतीला आवश्यक इतकीच असली पाहिजे. केवळ स्वातंत्र्य हे पुरे नसते. समतेने ते अर्थपूर्ण होते व त्याला सांगता येते. म्हणून आजच्या जगांत समाजसत्तावाद हा आवश्यक झाला आहे; कारण तोच एक अशी परिस्थिति निर्माण करू शकेल की ज्यास्तीत जास्त सामाजिक समाधान लोकांना वाटेल. समाजसत्तावाद हा मत्सरावर द्वेषावर उभारला जात नाहीं, त्याचा पाया सहकार व सामाजिक न्याय आहे. ह्या सर्व भावना आजच्या महाराष्ट्रांत जागृत आहेत. पण विस्कळीत आहेत त्या सर्वांना जुळवून घेण्याचे व त्यांतून एक नवी व प्रचंड विधायक शक्ति निर्माण करावयाची आहे. अन्य राज्यापेक्षां महाराष्ट्रांत समाजवादी राज्य होण्याला जास्तीत जास्त अनकूल अशी परिस्थिति आहे. आणि म्हणून प्रस्तुत लेखकानें पंडीतजींना जाहीर रीतीनें सांगितलें होतें कीं, तुम्हीं महाराष्ट्र राज्य करा व समाजवादाचा प्रयोग आम्हीं यशस्वी करून दाखवतो. महाराष्ट्र राज्य हे जर अन्य राज्याप्रमाणें होणार असेल तर त्यांत कांहीं स्वारस्य प्रस्तुत लेखकाला नाहीं हेंहि अनेक वेळां त्यानें सांगितले आहे. म्हणून महाराष्ट्र राज्यावर आज समाजसत्तावाद यशस्वी करण्याची मोठी नैतिक जबाबदारी येऊन पडली आहे. आज एका दृष्टीनें भारतीय महत्त्वाची अशी ही कामगिरी आहे. जो आज महाराष्ट्र निर्माण होत आहे त्यांत सर्व कांहीं मनाप्रमाणें होत आहे अगर सर्व कांहीं कांटेकोर न्यायानें होत आहे असेंहि नाहीं. तथापि जे मुख्य व महत्त्वाचे आहे ते, जे हेतू व जे आदर्श येथपर्यंत आपण जोपासले आहे ते कार्यान्वित करणें हे आहे. आणि जसजसे यश, या दृष्टीनें नव्या महाराष्ट्र राज्याला येत जाईल तसतसे दुरावलेले लोक जवळ येतील. परावलेले प्रदेश संलग्न होतील. राजकारणामध्यें नित्य व अपरिवर्तनीय असे कांहीं नाहीं. इतिहास हा कधीं स्तब्ध राहात नाहीं. तो सतत बदलत असतो. प्रश्न एवढाच आहे कीं, आपण त्याच्या मागे जावयाचे का त्याला आपल्या मागे आणावयाचे ? महत्त्वाकांक्षा महाराष्ट्राची अशी असली पाहिजे कीं, भगीरथामागे ज्याप्रमाणें गंगा चालली त्याप्रमाणें महाराष्ट्राच्या आदर्शजीवनामागे सर्व राष्ट्रीय जीवनाचा प्रवाह वाहावयाला पाहिजे आणि या कार्याचे मांगल्य व महत्त्व महाराष्ट्रीय समजेल अशी आशा आहे.

• •

तरीहि संयुक्त महाराष्ट्र झालाच !......................................१




" चंद्र सूर्य असेतोंवर मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र होणें शक्य नाहीं. "
इति स. का. पाटील

या महिन्यांतील
मुजऱ्याचे
मानकरी

# य श वं त रा व  च व्हा ण

सातारा जिल्ह्यांत म्हसवडची नागोबाची यात्रा मोठी प्रख्यात ! म्हसवडचा जनावरांचा बाजार म्हणजे शेतकऱ्यांच्या आयुष्यांतील सुवर्णक्षण. देशावरचे हजारों शेतकरी या यात्रेला जमा होतात. सिनेमाचीं थेटरं, तमाशाचे फड, मिठाईचीं दुकानं यांची एकच दंगल उसळते.

मला वाटतं १९४९ साल असावं तें. नागोबाच्या यात्रेचा हा उरूस साधून म्हसवडला एक मोठं शेतकी प्रदर्शन भरविण्यांत आलं होतं. या शेतकी प्रदर्शनाचा समारोप आणि बक्षिस समारंभ यशवंतराव चव्हाणांच्या अध्यक्षतेखालीं साजरा होणार होता. दुपारीं चारची वेळ. उन्ह रणरण करीत होतं. शेतकऱ्यांचीं डोकीं तापलीं होतीं–पण आपल्या आवडत्या पुढाऱ्यांचं भाषण ऐकण्यासाठीं ते ताटकळत बसले होते. व्यासपीठावर आडोशांत बसलेल्या अधिकाऱ्यांना आणि पुढाऱ्यांना उन्हाची तिरीप सोसवत नव्हती. पण यशवंतरावांचं भाषण ऐकण्यासाठीं जमा झालेल्या त्या भोळ्याभाबड्या शेतकऱ्यांना त्याची पर्वा नव्हती. अन् त्या दिवशीं यशवंतरावांचं भाषणहि असं छान रंगलं कीं कांहीं विचारूं नका.

त्यावेळीं यशवंतराव मुख्यमंत्री नव्हते, तर साधे पार्लमेंटरी सेक्रेटरी होते. पण अंतर्यामी जनतेचे सेवक आणि नेते अशीं द्विविध नातीं त्यांच्या व्यक्तिमत्वांत एकवटली होतीं. त्यावेळीं पार्लमेंटरी सेक्रेटरी यशवंतराव ज्या निरागसपणें शेतकऱ्यांत आणि आपल्या गांवाकडच्या मंडळींत मिसळत होते तो निरागसपणा ते मुख्यमंत्री झाल्यावरहि त्यांनीं टाकला नाहीं. दीड वर्षांपूर्वी कऱ्हाडजवळ इंदोलीसारख्या एका आडवळणी गांवांत मुख्यमंत्री यशवंतराव एका जाड्याभरड्या कांबळ्यावर विश्रांति घेत आहेत आणि भोंवतीं मित्रमंडळी, जुनी गांवकरी मंडळी, आतूर कार्यकर्ते यांनी कोंडाळं केलंय असंहि दृश्य मी पाहिलंय.

मला वाटतं यशवंतरावांच्या यशाचं रहस्य यांतच असावं. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या ऐन जमान्यांत यशवंतरावांइतका शिव्याशापांचा धनी कुणी झाला नसेल. आणि आज त्यांच्याइतका स्तुतिसुमनांचा वाटेकरीहि कुणी नसेल. पण स्तुति आणि निंदा यांनीं कधींच ते ढळले नाहींत. आज आपल्या स्तुतीचा अर्थ काय आहे, त्यामागें त्या वक्त्याची भावना आणि प्रेरणा कोणत्या किंमतीची आहेत, हें ते पूर्ण जाणतात.



मराठीं कर्तृत्वाचें यशवंत प्रतीक

पण यशवंतरावांनीं माणसं जोडलीं. प्रा. फाटकांसारख्या विद्वानाचं मन त्यांनी वळवलं. म्हणाले—"तुमचीं राजकीय मतं काय आहेत आणि काय असतील यांच्याशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं. पण तुमचें ज्ञान आणि विद्वत्ता मी जाणतो. आणि म्हणून स्वातंत्र्यचळवळीच्या इतिहासलेखनाच्या कार्याची धुरा तुम्ही खांद्यावर घ्यावी." बाहेर अनेक माणसं भेटीसाठीं तिष्ठत बसलीं आहेत–पण यशवंतराव फाटकांच्या गप्पांत इतके रंगले कीं, त्यांत तास दीडतास कसा गेला हें दोघांनाहि कळलं नाहीं.

यशवंतराव विद्वान् नाहींत पण विद्वत्तेचे चाहाते आहेत. ग्रंथकार नाहींत पण ग्रंथकाराचे लोभी आहेत. पार्लमेंटरी सेक्रेटरी असतांना पुण्याच्या स्टेशनवर व्हीलर स्टॉलवर पेन्ग्वीन् मालेंतील पुस्तकें खरेदी करण्यांत गर्क असलेल्या यशवंतरावांची माझी अनेक वेळां गांठ पडलेली आहे. ते पुस्तकांचे नादिष्ट आहेत. आणि साहित्यिकांच्या सहवासाला भुकेले आहेत. मुख्यमंत्री झाल्यावरची गोष्ट. एकदां माझे स्नेही श्री. स. आ. उर्फ भाऊसाहेब जोगळेकर मला सहज म्हणाले—"मला यशवन्तरावांना भेटायचंय–त्यांना माझीं पुस्तकं–विशेषतः सह्याद्रि भेटीदाखल स्वहस्तें द्यायचा आहे." मी म्हटलं मी जमवून आणतों तुमची भेट. कर्मधर्मसंयोगानें पुढील आठवड्यांत यशवंतरावांचा पुण्याला मुक्काम होता. इन्स्पेक्शन बंगल्यावर गेलों. आंत गर्दी होतीच, पण बाहेरही माणसांचा मोठा क्यू. मी मनांत म्हटलं, आज आपलीच भेट होत नाहीं. बारा वाजले. साडेबारा वाजतां मी धिटाईनें माझ्याकडे त्यांचं लक्ष वेधवलं. मी म्हटलं–भाऊसाहेब जोगळेकरांना आपल्याला भेटा-

( पान ६० वर पुढें चालू )



# शिवस्तुति

महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार

( हा ००० हा ००० अज्ञानदास बोले वचन
गाईन राजाचे भांडण
देश इलाइत, काबीज केलें तळकोकण
हा......जी जी......)

**गुरुजी :** या या बसा. बरे आलांत तुमचीच वाट पहात होतो. अज्ञानदासाच्या पोवाड्याचे सूर ऐकलेत ना ?

**जिज्ञासू :** ऐकले. अज्ञानदासाचा. शिवाजीवरचा पोवाडा चालला आहे हा. आज खरी शिवजयंति आहे. तेव्हां म्हटलं आपल्याकडे येऊन शिवाजीबद्दल कोणी काय लिहिलं आहे त्याची समजूत करून घ्यावी म्हणून मी आणि माझे मित्र आलो आहोंत. मित्रांचीहि तशी इच्छा आहे तेव्हां म्हटलं चला आमच्या गुरुजींकडे. ते तुम्हांला सर्व भांडार उघडून दाखवतील.



**गुरुजी :** ठीक आहे. तुमची इच्छा फार चांगली आहे. विचारणारेच कोठें भेटतात ? हां, काय दाखवूं तुम्हाला ?

**जिज्ञासू :** आमची इच्छा, शिवाजीचीं चरित्रें, वगैरे जी झाली असतील त्या सर्व लिखाणांची एकदां ओळख करून घ्यावी अशी आहे.

**गुरुजी :** सुरवातच करतो तर. ही पहा सभासदी बखर. ही शके १६१६ किंवा १६१९ मध्यें कृष्णाजी अनंत सभासद ह्यानें रचली म्हणजे शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर सुमारें १४-१५ वर्षांनीं तयार झाली. हिच्यांतील माहिती—

**जिज्ञासू :** पण गुरुजी, बखरींत सर्व भाकडकथा असतात असें म्हणतात.

**गुरुजी :** सगळ्याच बखरी तशा नसतात. बखरींतूनहि पुष्कळ मजकूर घेण्याजोगा असतो. बखरींचं वळण पौराणिक असतं. पण सभासदांची बखर फारच चांगली माहिती देणारी आहे. म्हणून तिला विद्वानांत फार मान आहे. सभासद आपल्या बखरीला "राजियांचे चरित्र आख्यान" असं म्हणतो.

**जिज्ञासू :** त्यांतल्या दोन ओळी तरी आम्हाला ऐकवा.

**गुरुजी :** शेवटच कसा सुरेख केला आहे...ऐका...

"राजा साक्षात केवळ अवतारीच जन्मास येऊन पराक्रम केला. नर्मदापासून रामेश्वरापर्यंत द्वाही फिरली, देश काबीज केला. आदलशाई कुतुबशाई, निझामशाई व मोगलाई या चारी पातशाहा व समुद्रांतील बेवीस पातशाहा असे जेरजप्त करून नवेंच राज्य साधून मराठा पातशाहा सिंहासनाधीश छत्रपति जाहला. प्रतिइच्छा मरण पावून कैलासास गेला. ये जातीचा कोणी मागें जाहला नाहीं पुढेंही होणार नाहीं." ऐकलंत.

**जिज्ञासू :** सभासदांशिवाय आणखी कांहीं बखरी असतीलच.

**गुरुजी :** आहेत तर. पण त्या साऱ्या, पुष्कळ पुढील काळांतील आहेत. त्यांत चिटणीसी बखर विशेष लोकप्रिय आहे आणि मल्हार रामराव चिटणीसांचे लिहिणें मोठें रोचक आहे. याशिवाय शिवदिग्विजय नांवाची बखर आहे. ती तर पुष्कळ मोठी आहे. व लिहिणें तर चिटणीसापेक्षां सरस आहे. शेडगांवकर बखर ही सुद्धा अशीच पुष्कळ माहिती देणारी आहे. शिवाय चित्रगुप्ताची आहे. पण या सगळ्या बखरींतून आख्यायिकांचा भरणा पुष्कळ झालेला दिसतो. तरी त्या सर्वांचं वाचन स्फूर्ति देणारं आहे यांत शंका नाहीं. छत्रपतिविषयीच्या प्रेमादरानं त्या भरलेल्या आहेत. वाचकांना रंगून टाकतील, तेव्हां त्यांची हेळसांड करूं नका.

**जिज्ञासू :** त्यांतील कांहीं नमुना ऐकण्याची फार इच्छा आहे.

**गुरुजी :** हा पहा चिटणीसांचा नमुना—"इकडे महाराजांनी








विचार केला. जें कांहीं एक साहस कर्म करून खानयांस मारावें. खानाच्या गोटावर चालून जावे. छापा घालावा. आपणच जाऊन खानाचे डोके कापून आणावे असें कित्येक बेत चित्ती दृढ करून कवाइत केली. जे कात्रजेच्या घाटानी जागा जागा झाडास पोत बांधावें. आणि बैलांचे शिंगासही बांधावें, कर्णेकरी व शिंगाडे पांच पंचवीस यांनीं डोंगरांत बिकट जाण्यास असावे आणि आम्ही फत्ते पावून इशारतीचा कर्णा सिंहगडाचे वाटेस एक वाजवू. ते समयी पोत उजळणार मावळे लोक नेमून दिलें होतें त्यांनीं पोत उजळावे व कर्णेकरी यांनी कर्णे, शिंगे, बाजे करून सर्वांसह निघोन जावे. म्हणजे त्या मार्गे छापा आला असे पाहून फौज व खान तिकडे जातील इकडे आवकाश सांपडल्यास गोट लुटावा. अगर पडेल तसी मसलत करून आपण सिंहगडास पोहचावे असा ठराव करून लोक यांस सिंहगडचे वाटेनें जागा जागा हाजार पांचशें असें करून देऊन घालणीचे जागा उभे केलें. आपण अंगांत जिरेटोप, त्याजवर अंगरखा घालून, पागोटे घालून, चोळणा कांचा घालून, तलवार बिचवा एका हाती व वाघनखें एके हाती, पाठीशी ढाल याप्रमाणें करून पाय उतारा, बरोबर घारकरी, येसाजी कंक, तानाजी मालुसरे, दादाजी बापूजी देशपांडे व चिमणाजी बापूजी देशपांडे व सुर्वे असे घेऊन मातब्बर निधड माणसें पंचवीस आसामी केवळ जवळ असावे. असें करून, पांच सहा हजार लोक निवडून घेतले ते ठेवित ठेवित आंबेओहळ येथपर्यंत आलें. पांच सातशे तेथे ठेवून गोटांत राजे शिरले. काळोख भाद्रपद मासचा. त्यांत काही पाउस त्या दिवसांत होता. गोटांत शिरून कोणी कोण म्हणून पुसलें असता, "चौकीचे लोक" म्हणून सांगत. वाडाजवळ महाराज आले. आंतील डेऱ्यांजवळ गेले. खानाचा लेक निजला होता. त्यास तेथेंच निजले जागा मारला आणि खानाचे बिचोव्यांत गेलें आणि छातीवर चढून बसले. वार करावा तो बायकोनें जागे होऊन पाहिले आणि पाय धरले. तेव्हां महाराजांच्या अंतःकरणांस द्रव आला म्हणून बहुत सावधपणें खबरदारीनें दाबून धरून गळ्यावर तलवार ठेविली व एकेहाते पोटास नखे लावली आणि खानास बोलिलें. जे, "आम्ही हात धरून नेवू तेथपर्यंत न बोलतां बरोबर यावे. सोडल्यावर जावे आणि कांहीतरी जास्त करितो या करितां शास्ताखान म्हणवावें. याप्रमाणें इमान कुराण शपथ घेऊन हाताची दोन बोटें कापून घेतली. ते समयी शास्ताखान भयभीत झाला. त्यास हाती धरून घेवून बायकोसुद्धां वाडापासी येवून आल्यावाटेनें आपल्या लोकांत बाहेर येवून, "शिवाजी तो मी, तूं मोहिम करून आलास. तुझे पारिपत्य करीन यास्तव युद्ध न करतां फिरुन जाणें नाहीतर मारीन" असें बोलून आंबे ओहळांत लोक ठेवलें होते त्यांत मिळाले आणि इशारतीचा कर्णा केला. याप्रमाणें शास्ताखान यास शास्त करून नामोहरम करून घालविला. महाराज बहोत संतोषी झाले. बरोबर लोक नेलें त्या सर्वांस नांवाजून आपणा बराबर धाडसें केली म्हणून सरफराजी करून बक्षिसें दिली. देशपांडे दोन आसामी यांस पाठविल्या दिल्या हे वर्तमान दिल्लीस गेलें. ते समयी पादशाहानें आश्चर्य केलें व त्यास क्रोधहि आला. "शिवाजी बडा शैतान पैदा हुआ" असें पादशहा बोलिलें. कोणीही कर्म आजपर्यंत न केलें, तेच करतो. आपलें सुभे बुडविलें. खान गेले याची शर्ती ऐशी केली. किल्ले कोट मुलुख घेतला. त्याचा बंदोबस्त, पारिपत्य, चांगलें झालें पाहिजे म्हणून बहुत विचारांत पडले."

ऐकलंत, कसं हुबेहुब चित्र उभे केलें आहे. आतां शिवदिग्विजयांतून निराळा प्रकार दाखवितो. "नंतर तयारी करून स्वारी रायगडास गेली, तेथील चोहोंकडील गीद दाखवून मजकूर किल्लेकोट, आसपास बिकट जागा, शत्रूस एकाएकी येण्यास दुर्घट समजावून भागाभट्टजीच्या नजरेस आली. तेथे राजधानीस योग्य जागा असें भटुजीनी सुमूहूर्त काढून दिला- त्या मुहुर्तावर काम चालीस लावले. हजारों मनुष्य मजूर, कारागिराचे हाताखाली सुता गवंडी, सिल्पट, चितारी, नजूरबाज (तार्कीकी) चतुर माणसे ज्यांची किर्ती कुशलतेची लोहार सहित सोनार सुद्धां माणसे पाठवून, त्यांची कर्जे वारून, घरवेजमीस हजारो रुपये देऊन, मोठ्या साहसांनी कारागीर आणविलें. एकंदर आवाडास कुसू घातलें. त्याजला आय कोणता असावा ? जो महाल करणें त्यांस आय कोणता असावा ? त्याप्रमाणें त्याची योजना करून पाये उकरून फत्तर सुती करून, चुनामाती कमावून सुमुहूर्ते पाहून प्रारंभ केला. ते दिवशी महाराजांनी ब्राह्मणास वस्त्रे नानाप्रकारची वरदक्षणा दिली व कारागिरास वस्त्रें व कडीं देऊन कामावरी खुशीनें आपली बुद्धीनें कुशलता करून दाखवून बक्षिसाची इच्छा धरून कामास लागलें. भटजींनी आय गणित करून ज्या उपयोगी जे सदन, ज्या आयाचे त्याची योजना करून महाराजांस सांगितली. ती घरें कशी, कोणत्या कर्माची करविली त्याचा विस्तार किती लिहावा. परंतु यथाकिञ्चित लिहितो बी तपशील.

(१) राजसभा (कचेरीची जागा) तेथें कचेरी व्हावी.

(१) विवेकसभा. तेथें पंडितानी पूर्वोत्तर पक्ष करीत असावेत. नाना पुराणांचे इतिहास कथा श्रवण करावयांत.

(१) न्यायसभा, तेथें आर्थी यांचा विवाद मनांत आणित असावा.

(१) प्रकट सभा, तेथें गोरगरीब यांची फिर्यादी ऐकत असावी.

(१) प्रबोधसभेचे ठायीं कीर्तनादि शास्त्रपुराण मतितार्थ श्रवण करावा.

(१) रत्नागार सभेचे ठायीं नानाप्रकारचे अलंकार नाना वस्तु नाना द्रव्ये, कापडसहित अमूल्य जिन्नस मात्र आणवून, परीक्षून ठेवावे.

(१) नीतिसभेचे ठायी परकीय परस्थळीहून आला अगर स्वकीय आला असता त्याची भेट घेऊन देशविदेश चर्चा करणें. करावी. शिक्षाप्रद आज्ञा व्हावी. अधर्मी भाषण होऊ नये. त्याचे नांव नीतिसभा. मंगलकार्यस्थानें यांची जागा.

(१) राजमंदीर, भोजनशाळा, अंतरपल्या राहणें, निद्रादि स्थानें अनेकप्रकारची चातुर्य कुशलतेची चित्रविचित्र स्थानें देवागारें इत्यादि स्थानांस प्रवृत्ति-राजवाडा म्हणजे भांडारसहित वाडा इत्यादि प्रकारें व्यवस्थापूर्वक त्या सर्वांसहित एक घर त्यांत जाण्यायेण्यास मार्ग एका घरांतून सर्वाठायी असावें, सन्निध मार्ग दिसावा. वर्तमान कळावे ऐकावें अशा चालीनी तयार करविला. त्याची कामें किती वर्णन करावींत. त्या सभेच्या ठायीं रंगदेवता मनुष्यमात्राचें अंतःकरणास आल्हादकारक, जावे बसावे पहावे अशीच इच्छा व्हावी. सारांश सर्वोत्कृष्ट काम. उपमेस-अशी धर्मराजांस मयासुरानें मयसभा करून दिल्ही तद्वत राजवाडा महाराजाचा रायगडच्या किल्यावर केला तो अवर्णनीय. अशाप्रकारची वर्णनें ह्या शिवदिग्विजयांत आणखींही आहेत. त्यावरून

लेखकाचा बहुश्रुतपणा दिसून येतो. प्रफुल्लित मनानें मनमानेसा विस्तार त्यानें केला आहे.

**जिज्ञासू :** हे उतारे ऐकून अधिक ऐकण्याची आमची इच्छा फारच वाढली आहे.

**गुरुजी :** असे उतारे ऐकत बसलं तर रात्र पुरणार नाहीं. आणखी एक शहाण्णव कलमी म्हणून महत्वाची बखर अभ्यासास फार उपयोगी आहे. अशी कलमवार टिपणें किंवा शकावल्या वगैरे लिहून ठेवण्याचा जुन्या काळीं पुष्कळ प्रघात होता. त्यांत जेधे शकावली प्रसिद्ध आहे.

**जिज्ञासू :** जेधे शकावलीचे नांव आम्ही ऐकलें आहे. पाहूं बरं.

**गुरुजी :** तुम्ही नुसती मराठी साधनें पहात बसाल तर इतर भाषांतील लिखाणें पहाण्याची तुमची इच्छा तशीच राहून जाईल.

**जिज्ञासू :** आमच्या तें लक्षांत आहे. पण तुम्ही शिवाजी महाराजांच्या वेळची कांहीं अस्सल पत्रें वगैरे साहित्याबद्दल आम्हाला कांहींच सांगितले नाहीं.

**गुरुजी :** खरंच त्याबद्दल कांहींतरी बोललं पाहिजे. शिवाजी, शहाजी वगैरेंच्या वेळची पुष्कळ मराठी कागदपत्रें मिळालेली छापली आहेत. पण ती बहुतेक इनाम, वतनें, सनदापत्रें महजर (निवाडे) वाटणीपत्रें दानपत्रें अशींच पुष्कळशीं आहेत. नांवागांवाचा तपशील व घटना जुळवितांना त्यांचा फार उपयोग होतो. राजवाडे यानीं अशा कागदपत्रांचे सात आठ खंड छापले आहेत. ह्यानंतर शिवचरित्र साहित्य या नांवानें लहानमोठे १०–१२ खंड छापले आहेत. तें काम पुढें पुढें चालू आहे आणि चालू राहील.

**जिज्ञासू :** आणि पोवाडे ?

**गुरुजी :** पोवाडे, जुने शिवाजीच्या वेळचे फारच कमी मिळाले आहेत. अलिकडे आधुनिक शाहिरांनी केलेली रचना तुम्ही पुष्कळदां ऐकली असेलच. या पोवाड्यांच्यामुळें मराठ्यांच्या इतिहासाकडे लक्ष लागून, हॅरी अरबूत नॉट ॲकवर्थ या युरोपियन आय. सी. एस. गृहस्थानें एक मनोहर चमत्कार केला आहे. अज्ञानदासाचा अफझुलखानावरील, तुळशीरामाचा सिंहगडावरील असे जे दोन पोवाडे शिवाजीबद्दल मिळाले आहेत. त्यांचीं या गृहस्थानें इंग्रजी भाषेंतील पोवाडे छंदांत सुंदर भाषांतरें छापून प्रसिद्ध केली आहेत. आणि या गृहस्थाला शिवाजीविषयीं आणि मराठ्यांविषयीं चांगला अभिमान होता असें दिसतें. मूळ मराठी पोवाडे मिळविण्याचें काम मुख्यता शंकर तुकाराम शाळिग्राम यांनीं केलें. ॲकवर्थ यांचा तोच आधार होता. आधुनिक मराठी मंडळींत महात्मा ज्योतिबा फुले यांनीं शिवाजीवर केलेला पोवाडा सर्वांत पहिला म्हणावा लागेल. हे पोवाडे वीरश्री व स्फूर्ति निर्माण करण्याला फार उपयोगी पडतात. आणि आम जनतेंत सर्व वर्गात अभिमान आणि स्मरण जागते ठेवतात.

**जिज्ञासू :** ॲकवर्थ साहेबांच्या भाषान्तराच्या चार ओळी तरी ऐकवा कीं आम्हाला.

**गुरुजी :** ह्या घ्या तुळशीरामाच्या पोवाड्याच्या वेशक शेवटच्या ओळीं ऐका.

And ye Marathas Brave give ear
Tanaji's exploits crowd to hear
Where from your whole dominin wide
Shall such another be supplied
O'er seven and twenty castles high
His sword did wave victoriously
The iron years are backw ard roll'd
His fame restores the age of gold.
Whenever this song ye sing and hear
Sins are forgiv'n and heaven is near.

**जिज्ञासू :** फार सुंदर आहेत ह्या इंग्रजी ओळी.

**गुरुजी :** मुळाशी ताडून पहाल तर कळेल की ॲकवर्थनें शब्दशः भाषांतर नाहीं तर मुख्य अभिप्राय मोकळ्या भाषेंत मांडला आहे. बरं. मराठीची संगत आतां सोडावी असं म्हणत होतो पण आतां आठवलं आतांच सांगून टाकतो. ही पहा आमात्यांची राजनिती.

**जिज्ञासू :** कसली राजनीती ? कोणाची ?

**गुरुजी :** हे अमात्य म्हणजे शिवाजीचे अमात्य रामचंद्र निलकंठ. शिवाजीच्या पश्चात जो कठीण प्रसंग गुजरला त्यावेळी ही तयारी झाली आहे. हिचें रूप आज्ञापत्राचे आहे. पण तिच्यांत अमात्यानें शिवाजी महाराजांचें समग्र चित्र इतकें बहारदार रेखाटलें आहे कीं त्याला तोड सापडणार नाही. मी तर म्हणतो की ते सर्व शिवाजी भक्तांनीं तोंडपाठ करावे. तुम्हाला वाचूनच दाखवतो. उतरून घ्या.

"तीर्थरूप श्रीमन्महाराज शककर्ते छत्रपतिसाहेब स्वास्ता यवनाश्रय असतां त्यापासून पुणें आदि करून स्वल्प मागून घेऊन १५ वर्षांचें वय असतां त्या दिवसांपासून तितकेच स्वल्पमात्र स्वास्तेवर उद्योग केला.

तरीहि संयुक्त महाराष्ट्र झालाच !........................२



"द्विभाषिकाचा 'कारभार' फार छान चालला आहे."
इति मुरारजी




आयुर्मर्माणि रक्षन्ति. आयुरन्न. प्रयच्छति.
गाण्डीतिनो मतमिंद. कुतो दैन्यं कुतोप्रयम.

तसेंच उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः या दृढबुद्धीनें शरीरास्था न पाहतां केवळ अमानुष पराक्रम जे आजपर्यंत कोणीही केलें नाहींत व पुढें कोणाच्यानें मनेंहि कल्पवेना असें स्वांगे केलें. मनुष्यपरीक्षेनें नूतनच सेवक नवे नेमून योग्यतेनुसार भार वाढवून महत्कार्योपयोगी दाखविलें. एकास एक असाध्य असतांहि स्वसामर्थ्य सकलांवर दया करून एकाचा एकापासून उपमर्द होऊ न देतां एकरूपतेनें वर्तवून त्यांच्या त्यांच्या हातून स्वामिकार्यकरून घेतली. दक्षिणप्रांती इदलशाही, कुतुबशाही व निजामशाही ही पराक्रमी सहान सकलार्थे समृद्धिमंत संस्थानें, तसेंच मोंगल, एक एक सुभा लक्ष लक्ष स्वारांचा, यांविरहित शामल, फिरंगीइंग्रज, बलंदेज, रामनगरकर, पाळेगार सोंदे बिदनूर म्हैसूरवाले, त्रिचनापल्ली आदिकरून संस्थानिक तसेंच जागाजागा पुंड बंदरराव शिर्के, सावंत, दळवी वरघाटे निंबाळकर घाटगे, आदिकरून.

देशमुख व फाटक सकलहि पराक्रमी, सज्ज ते सामान पूर असतांहि बुद्धिवैभव पराक्रमें कोणाची गणना न करितां कोणावर चालून जावून तुंबेल युद्ध करून रणाशी आणिलें. कोणावर छापे घातले. कोणास परस्परे कलह लावून दिलें. कोणाचे मित्रभेद केलें. कोणाच्या डेऱ्यांत शिरोन मारामार केली. कोणाशी एकांगी करून पराभविलें, कोणाशी स्नेह केंले. कोणाच्या दर्शनास आपण होऊन गेले. कोणास दर्शनास आणिलें, कोणास परस्परांस दंगे करविले, कोणी इतर प्रयत्नें नाकळत त्यांच्या देशांत जबरदस्तीनें स्थळें बांधून अनुक्रमें आकळिलें. जलदुर्गसहित होते त्यांस नूतनच जलदुर्ग निर्माण करून पराभविलें, दुर्घट स्थळे नौकामार्गें प्रवेशिली. असें ज्या ज्या उपायें जो जो शत्रू आकळाव त्या त्या उपायें तो तो शत्रू पादाक्रांत करून सालेरी अहिवंतापासून चंजी कावेरी तीरापर्यंत निष्कंटक राज्य, शतावधि किल्ले, तसेंच जलदुर्ग, किती एक विशाल स्थळे, चाळीस हजार पागा व साठ सत्तर हजार शिलेदार, दोन लक्ष पदाति, कोट्यवधि खजिना, तसेंच उत्तम जवाहिर, सकल वस्तुजात संपादिलें. शाण्णव कुळीचे मराठे यांचा उद्धार केला. सिंहासनारूढ होऊन, छत्र धरून छत्रपति म्हणविलें. धर्मोद्धार करून देव ब्राह्मण संस्थानी स्थापून यजनयाजनादि षटकर्मैं वर्णविभागें चालविली. तस्करादि अन्यायी यांचे नांव राज्यांत नाहींसें केलें. देशदुर्गादि, सैन्यादि बंद नवेच निर्माण करून एकरूप अव्याहत शासन चालविलें, केवळ नूतन सृष्टिच निर्माण केली. औरंगजेबासारिखा महान शत्रू परितापसागरी निमग्न करून दिगंत विख्यात किर्ती संपादिली ते हे राज्य."

**जिज्ञासू :** खरोखरच फार अप्रतिम आहे, आम्ही अगदीं वेडावून गेलो.

**गुरुजी :** तसं म्हणाल तर अमात्याची खरी राजनीतिच केवळ बिनतोड आहे. जुन्या मराठी साधनांत राजनीतिची सर दुसऱ्या कशालाहि येणार नाहीं,



अनुक्रमणिका

**जिज्ञासू :** आतां इतर भाषांकडे वळू या.

**गुरुजी :** इतर भाषांत म्हणाल तर युरोपिअन भाषांतील साहित्य एका दृष्टीनें सर्वांआगळे ठरेल. तुम्हास माहितच असेल इंग्रज आणि शिवाजी यांचा उदय ठोकळमानानें एकाच वेळीं सुरू झाला. या युरोपियन लोकांची चालरीत फार निराळी. जे व्यवहार करावे ते तेव्हांच लिहून ठेवावे. कोणी प्रवास केला तर त्याची सविस्तर हकीगत लिहून काढावी वगैरे संवयी युरोपियन लोकांत असल्याकारणानें आणि लिहिलेल्या गोष्टी जतन करून ठेवण्याची त्यांना हौस असल्यानें अगदीं तारीखवार तपशीलवार अशी माहिती त्यांच्या लेखांतून पुष्कळच मिळते. जी त्यानीं प्रत्यक्षच पाहिली किंवा अनुभवली असते ती त्या पातळीच्या महत्वाची समजावी लागते. पण ऐकीव माहिती ते देतात तेव्हां ती तसल्या पातळीवरील समजावी लागते. शिवाय युरोपियनांची दृष्टि फार चोखंदळ व नजर फार बारीक त्यामुळें त्यांची लिहिणी विविधप्रकारच्या माहितीनें विविधप्रकारच्या अभिप्रायांनीं भरलेली आहेत.

**जिज्ञासू :** हे इंग्रजीचे लेख कोठें मिळाले ?

**गुरुजी :** इंग्रजांचे पुष्कळ लेख प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांत इथें हिंदुस्थानांतच आहेत. दुसरें पुष्कळ इंग्लंडमध्यें आहेत. सरकारी बिनसरकारी अशी भांडारे आहेत त्यांतून शिवाजीचा संबंध असलेला मजकूर शोधून काढून इंग्लीश रेकॉर्डस ऑन शिवाजी, या नांवानें पुण्याहून प्रसिद्ध झाला आहे. त्याची पानें ११०० च्या वर आहेत.

**जिज्ञासू :** अबब. आम्हाला नव्हतें माहीत. त्यांतला कांहीं मजकूर कानीं पडावा अशी फार इच्छा आहे.

**गुरुजी :** प्रचंड भांडार आहे ते. तुम्हाला एक आश्चर्य सांगतो. आपलं लिहिणं कोणी छापील किंवा प्रसिद्ध करील अशी त्या लिहिणारांना कल्पना नव्हती. ह्या दूरदेशीच्या लोकांवर शिवाजीची अशी विलक्षण छाप पडली कीं, शिवाजीचें चरित्र पाहून त्यांना युरोपच्या इतिहासांतील सर्वांत मोठ्या पुरुषांची सहजगत्या आठवण झाली. हे कोणते पुरुष म्हणाल तर तो जगज्जेता अलेक्झांडर (सिकंदर बादशहा) तसाच जो ज्यूलिअस सीझर किंवा हॅनीबॉल अशा महाविख्यात वीरांची.

**जिज्ञासू :** म्हणजे अजबच गोष्ट आहे.

**गुरुजी :**

Siddy Mussud who in company with Serjackaun Mogulls General intends to march against Sevagee with 80,000 horses with resolution to destroy him utterly, but it is too wellknown that Sevagee is a second Sertorious and comes not short of Honiball for stratagems. And no longer then this very day arrived news from the Lasscarr or army that the King of Gulkonda, Deccanies and Sevagee have very lately made contederady against Mogull and are now resolved to to bent Delikkaun out of Deccan. Sevagee having gotten 10,000 horses togeather to come upon the back of him and was the only Politition that deverted the Deccanies and Cuttub show from joyning with Delikun against him.




शिवाजी महाराजांचा पराक्रम हिंदी भाषेंत अजरामर करणारा उत्तरभारतीय कवि भूषण याचें शिवचरित्रपर काव्य सर्वांच्या परिचयाचे आहे. 'शिवाजी न होता तो सुनत होत सबकी'— शिवाजी राजे उदयास आले नसते तर सर्वांची सुंता झाली असती—हें त्याच्या कांहीं कडव्यांचें पालुपद लोकांच्या परिचयाचें आहे. भूषण हा कवि होता हें लक्षांत ठेवलें म्हणजे कवित्वाच्या अद्भुत भराऱ्या असतील हें निराळें सांगायला नको. तथापि शिवाजी-महाराजांच्या चरित्रांतील मोठे प्रकरण, अफजलखानाचा वध, साल्हेरमुल्हेरची लढाई, यासारखे लहानमोठे प्रसंग त्यानें वर्णिले आहेत त्यावरून कवीला शिवाजीमहाराजांच्या कर्तृत्वाचें ज्ञान होतें याबद्दल संशय रहात नाहीं. त्याच्या काव्यांतील एक कडवे अर्थासह पुढें दिलेलें आहे. त्या कडव्यांत त्यानें शिवाजीमहाराजांच्या कर्तृत्वाचें फळ कोणतें हें सांगितलें आहे.

> वेद राखे विदित पुरान परसिद्ध राखे ॥
> रामनाम राखे अति रसना सुधरमें ॥
> हिंदुनकी चोटी रोटी राखि है सिपाहनकी ॥
> कांधमें जनेउ राखी माला राखी गरमें ॥
> मीडि राखे मुंगल मरोडि राखे पादशाह ॥
> वैरी पीसी राखे वरदान राखे करमें ॥
> राजनकी हद्द राखी तेग बल शिवराज ॥
> देव राखे देवल स्वधर्म राख्यो घरमें ॥

अर्थ—वेदांचें तसेंच पुराणांचे रक्षण केलें. हिंदूंच्या जिभेला राम-नाम उच्चारण्याचें सामर्थ्य आलें. (महाराजांनीं) हिंदूंच्या शेंडीचा तर बचाव केलाच पण शिपायांना पोटभर अन्न मिळण्याची व्यवस्था लावली. ब्राह्मणांच्या खांद्यावर जानवें आणि वैष्णवांच्या गळ्यांत माळ (आज) दिसते (हा शिवराजाच्या प्रतापाचा परिणाम आहे) हिंदूवर धांवणाऱ्या मोंगलांचे पाय (महाराजांच्या शौर्यानें) आखडले. बादशहादेखील हादरून गेलेला आहे. वैरी भरडले. गरीबांसाठीं (महाराजांच्या) हातावर (सदैव) दान सज्ज असते. (निरनिराळ्या) राजांच्या राज्यसीमा टिकून आहेत याचें कारण शिवाजी महाराजांची तलवार. देवळांतून देव आणि घरांघरांतून (हिंदूंचें) स्वधर्माचारण शिल्लक आहे, (हा शिवराजाचा महिमा.)

अनुक्रमणिका








पाहिलेंत अशी बारीक बातमी आहे इंग्रजांची? कसला धक्का दिला आहे शिवाजीनें ?

**जिज्ञासू :** सॅटोरियस आणि हॅनिबॉल कोण ?

**गुरुजी :** हे रोमन काळांतील अद्वितीय शूर वीर होते.

**जिज्ञासू :** अलेक्झांडर व सीझर यांचे दाखले अजून आलेच नाहींत.

**गुरुजी :** आहेत, माझ्यासमोर आहेत. दाखविन एकदां केव्हांतरी आतां एक दुसरी गंमतच तेवढी दाखवतो. शिवाजीला प्रत्यक्ष पाहून केलेली वर्णनें आपल्याला युरोपियनांची सांपडतात. त्यांतल्या दोन ओळी ऐका.

His person is disenbed by them who have seen him to bee of meane stature, lower some what, then I am erect and of an excellent praportion, active in exercise, and whenever hee speaks seemes to smile a quicke and peercing eye and waitter than any of his people.

अशी आणखी पुष्कळ वर्णनें आहेत. त्यांत शिवाजीचें वजनसुद्धा दिलें आहे.

**जिज्ञासू :** आज आमची भूक फार वाढली.

**गुरुजी :** एकाच बैठकींत तुमचें पोट कसें भरेल ? आज भूक वाढवून ठेवतो. प्रवाशांची वर्णनें आणि ईस्ट इंडिया कंपनीची कागदपत्रें वगैरे अफाट मजकूर इंग्रजीत आहे. करून अभ्यास कराल तर सर्व कांहीं दाखवीन. तुम्हाला आतां थोडा मासला दुसऱ्या युरोपियनांच दाखवितो.

**जिज्ञासू :** इंग्रजांशिवाय दुसऱ्यांनीहि लिहिलेय वाटते ?

**गुरुजी :** मग त्यांत आश्चर्य कसलें ? सांगितलें ना मघाशी कीं सर्व युरोपियनांना एकच कळत होतं. शिवाजीबद्दल डचांनी लिहिलें, फ्रेंचांनी लिहिलें, आणि फिरंग्यांनी म्हणजे पोर्तुगीजांनीहीं लिहिलें.

**जिज्ञासू :** आणि जर्मन ?

**गुरुजी :** त्यांचा संबंध त्यावेळीं फार आला नव्हता पण मराठ्यांचा पहिला इतिहास युरोपियन मंडळींत लिहिला तो स्प्रेंगेल या जर्मन माणसानें आणि तो छापून झाला तो ऐन पेशवाईत. पुढल्या गोष्टी द्या सोडून. पण प्रत्येक शिवाजीच्या काळीं हिंदुस्थानांत राहिलेले आणि शिवाजीला अगर शिवाजीच्या मंडळींना पाहिलेले अशा कांहीं युरोपियनांनी लिहिलेल्या माहितीविषयक आपण कांहीं बघूं. यांत आश्चर्य असें शिवाजीची चरित्रेंसुद्धां व कित्येक युरोपियनांनी लिहिलेलीं सांपडलेलीं आहेत. मग शिवाजीचा नुसता उल्लेख करणारी इतर पुष्कळ मंडळी आहेत. काय म्हणता ?

**जिज्ञासू :** चरित्रें ? नवलच आहे.

**गुरुजी :** नवल कसलें हो ? तो शिवाजीच्या मोठेपणाचा प्रत्यक्ष पुरावाच आहे. कॉस्मे द गादी या पोर्तुगीज कॅथलिक गृहस्थाला शिवाजीबद्दल प्रेम होतें. या गृहस्थानें शिवाजीच्या न्यायनीतीची व लोककल्याणाची आणि मुत्सद्देगिरी व सेनानायकत्वाची फार तारीफ केली आहे. हे सन १६९५ मधील चरित्र त्यांत पुष्कळ चुका असल्या तरी अवश्य वाचण्या जोगें आहे. यानंतर थेवेनो १६६५-६७ आणि ॲबेकॅरे (१६६८-७३) यांनीं लिहिलेली शिवाजीची चरित्रें वाचण्याजोगी आहेत. १६६६ त थेवेनो सुरतेस आला. हा चांगला शिकलेला होता. आणि इ. स. १६८७ त म्हणजे संभाजी जिवंत होता त्यावेळीं हें इंग्रजी भाषांतर छापून झालें होतें. ॲबेकॅरा हा फ्रेंच पाद्री होता. आणि तो हिंदुस्थानांस एक दोन वेळां येऊन गेला. हाही शिवाजीचा मोठा अभिमानी दिसतो. त्याला शिवाजीची मंडळी प्रत्यक्ष भेटली होती. म्हणून त्याचे अभिप्राय फार मोलाचे आहेत. त्याचे चरित्र १६९९ प्रसिद्ध झालें शिवाजी आणि फिरंगी यांच्यांत झालेल्या वाटाघाटीस हा दवणेस हजर होता. कोइ मार्टीन या तिसऱ्या फ्रेंच गृहस्थानें जी

आपली स्मरणें लिहिलीं आहेत ती तर फारच महत्वाची आहेत. पेरी दार्गिस यानें लिहिलेल्या हिस्तवार द शिवाजी या फ्रेंच चरित्राचे भाषांतर जदुनाथ सरकार यांनीं केलें आहे. पोर्तुगीज भाषेंत पुष्कळ पत्रें वगैरे प्रसिद्ध झाली आहेत. डच लोकांनीं इंग्रजाप्रमाणें हिंदुस्थानांत व्यापार केला. त्यांनीं आपल्या व्यापार कंपनींतील निवडक कागदपत्रें छापून प्रसिद्ध केली आहेत. डाग रजिस्टर या नांवानें सुमारें ३० खंडांत प्रसिद्ध केली आहेत, आणि अप्रसिद्ध अशी पुष्कळच माहिती त्यांच्या दफ्तरखान्यांकडून आहे. या प्रमाणें हे युरोपिअन साहित्य म्हणजे माहितीचा समुद्र आहे. कोठवर वर्णावा.

**जिज्ञासू :** मुसलमानांनीं कांहीं लिहिलें नाहीं का ?

**गुरुजी :** तसें कसें होईल ? मुसलमानांनीं लिहिलेले मोठमोठे इतिहास आहेत. चरित्रें आहेत आणि त्याशिवाय बातमीपत्रें दिनचर्या म्हणजे आखबारांत वगैरे पुष्कळच आहेत. सनदा, फर्मानें हुकूम वगैरे विविध प्रकारचें साहित्य आहे. खाफिखाच्या मुंतखब उल्लुबाब यांचा उल्लेख फार वेळा येतो. साकी मुस्ताकखान याचा माआसीर आलमगिरी मिर्जा महमद काज़ीय यांना आलमगिरनामा भीमसेन बऱ्हाणपूरी यांची माहिती प्रत्यक्ष पाहून लिहिलेली आहे. त्याचा नुस्खा इ दिलकशा असें पुष्कळच ग्रंथ आहेत, खतूत इ शिवाजी. म्हणून शिवाजीविषयींची फारसी पत्रें आहेत. याशिवाय महमदनामा आलिनामा इस्तकुरसी इतअंजुमान, तारीख ए शिवाजी वगैरे अनेक ग्रंथ आहेत. त्यांचा सर जदुनाथ सरकार यांनीं आपल्या शिवाजी चरित्रांत भरपूर उपयोग केला आहे. शिवचरित्र वृत्तसंग्रह खंड २ रा मध्यें श्री. ग. ह. खरे यांनीं कांहीं फारशी ग्रंथांतील माहिती मराठींत प्रसिद्ध केली आहे. शिवाय फारशी शिलालेख आहेत. फारशी साहित्यांत तारखा वगैरे पुष्कळ दिलेल्या असतात. पुष्कळ फारसी ग्रंथांची इंग्रजी भाषांतरहि झाली आहेत. मूळ फारसी तुम्हांस कांहीं समजणार नाहीं. तेव्हां या महत्वाच्या भांडाराविषयीं अधिक बोलणें योग्य होणार नाहीं. कानडी मध्येंहि साहित्य आहे. कंठीरव नवसराज विजयम, चिकदेवराय न्दिुपम केळदि नृपविजय असा कानडी ग्रंथांतून शिवाजीविषयीं कांहीं माहिती मिळते. त्यांत दक्षिणेकडील भाग अधिक असतो. चिकदेव राजाच्या चरित्रांत पौराणिक पद्धतीची अतिशयोक्ति पुष्कळ आहे. चिकदेवरायाच्या बिरूदाच्या वर्तनाची वाक्यें देतो. त्याने कल्पना येईल.

संगरभीम उदवृत्तत्राण
चमुविक्षो चण विचतण
विक मराट शिवाजी बाजि सेनाधिप
जयतजी काटकर दादजी काकड प्रमुख
कंठनालोच्छलदवत्तधारासिक्त कृपाणसंदर्शन
विलिन हरजी संतजी मुख्य महाराष्ट्र
नृप प्रवक शहाजी मु ख मराठ नृप
राजधाने वृत्ता भंगूर वेगळूर हरण
निध्प्रणित शंभूजी साइजी संतजी हरजी प्रमुख
महाराष्ट्र नृपालजाल.

इत्यादि कानडी भाषेंतील हा मजकूरहि खरे यांनीं प्रसिद्ध केला आहे. तुम्हांला हिंदीतील भूषण कवीची माहिती आहे. त्याचा एक दोहा देतो.

" औरंगहि जिति सकैची और न राजा राव.
हस्थि मत्थपर सिंहबिनु आन न घाले घाँव.

शिवाजीच औरंगजेबाला जिंकू शकेल दुसऱ्या राजांची हिंमत नाहीं. हत्तीच्या मस्तकावर सिंहावाचून दुसरा कोण घाव घालील ? आणखी एक कविता देतो.

बचेगा न समुहाने बहलोलखाँ अयाने
भूषण बखाने दिल आनि मेरा बरजा
तुज ते सवाई तेरों भाई सलहरी पास
कैद किया साथ का न कोई बीज गर्जा
साहिन के साही उसी औरंगके लिन्हे गढ.
जिसका तु चाकर और जिसकी है परवा
आफजलका मलइ शिवराज आया समजा.

मूर्खा बहलोलखाना, शिवाजीसमोर जाऊं नकोस. माझें ऐक. तुझ्यापेक्षां सवाई तुझा भाऊ इखलसखान साल्हेरीजवळ कैद केला. त्यावेळीं तुमचा वीर कोणी गरजला नाहीं. तूं ज्याचा चाकर आहेस, प्रजा आहेस त्या शाहनशहा औरंगजेबाची श्रीगड शिवाजीनें घेतलें. तो शहाजीचा प्रिय पुत्र दिल्लीच्या सैन्याला कुंचलणारा आणि अफझलखानाच्या सैन्याचा चिंधीचोळा करणारा शिवाजी सिंह आला आहे बघ.

**जिज्ञासू :** फारच अफाट सामुग्री आहे. शिवाजीबद्दल.

**गुरुजी :** अजून काय झालें. संस्कृतमध्येंहि पुष्कळच आहे की.

( पान ६० वर चालू )

तरीहि संयुक्त महाराष्ट्र झालाच !......................३



" द्विभाषिक ही ' अदृश्य ' शैलीची देणगी आहे. "
इति पं. नेहरू





# जलद वहातुकीनें माल रवाना करून निश्चीतपणें वेळेवर मिळतो.

मुंबई रेल्वेजकडून कांहीं महत्त्वाच्या वहातुकी खालील दाखविल्याप्रमाणें आतां सुरू करण्यांत आलेल्या आहेत.

**मध्य रेल्वेवरून**

| | | | वहातुकीचा वेळ | |
|---|---|---|---|---|
| वाडीबंदर | ते | शालीमार | ८ | दिवस |
| ,, | ते | टाटानगर | ७ | ,, |
| ,, | ते | नागपूर | ३ | ,, |
| ,, | ते | सॉल्ट कॉटोर | ६ | ,, |
| ,, | ते | आडोणी | ५ | ,, |
| ,, | ते | येरागुंठा | ५ | ,, |
| ,, | ते | बंगलोर सिटी | ५ | ,, |
| ,, | ते | कोल्हापूर | ३ | ,, |
| ,, | ते | कानपूर | ५ | ,, |
| ,, | ते | बेझवाडा | ५ | ,, |
| ,, | ते | शिकंदराबाद | ३ | ,, |
| ,, | ते | हैद्राबाद | ३ | ,, |
| ,, | ते | सोलापूर | २ | ,, |
| ,, | ते | अकोला | २ | ,, |
| ,, | ते | अमरावती | २ | ,, |
| ,, | ते | जबलपूर | ३ | ,, |
| ,, | ते | सतना | ४ | ,, |
| ,, | ते | भोपाळ | ३ | ,, |
| ,, | ते | ग्वाल्हेर | ४ | ,, |
| ,, | ते | लखनौ | ७ | ,, |
| पुना | ते | नवी दिल्ली | ५ | ,, |
| ,, | ते | शालिमार | ७ | ,, |
| सोलापूर | ते | बेझवाडा | ४ | ,, |
| ,, | ते | सॉल्ट कॉटोर | ५ | ,, |
| ,, | ते | नवी दिल्ली | ५ | ,, |
| ,, | ते | शालीमार | ७ | ,, |

**पश्चिम रेल्वेवरून**

| | | | वाहतुकींचा वेळ | |
|---|---|---|---|---|
| करनाक ब्रीज | ते | नवी दिल्ली | ५ | दिवस |
| ,, | ते | अमदाबाद | ४ | ,, |
| ,, | ते | इंदोर | ४ | ,, |
| ,, | ते | सुरत | ३ | ,, |
| ,, | ते | वेलांगंज | ६ | ,, |
| ,, | ते | बडोदा | ३ | ,, |
| ,, | ते | अमृतसर | ८ | ,, |
| ,, | ते | लुधियाना | ८ | ,, |
| ,, | ते | जालंदर सिटी | १० | ,, |
| अहमदाबाद | ते | बेझवाडा | ६ | ,, |
| नवी दिल्ली | ते | करनाक पूल | ५ | ,, |
| ,, | ते | अहमदाबाद | ६ | ,, |
| वेलांगंज | ते | करनाक ब्रीज | ६ | ,, |
| अहमदाबाद | ते | करनाक ,, | ४ | ,, |
| इंदोर | ते | करनाक ,, | ५ | ,, |
| सुरत | ते | करनाक ,, | ३ | ,, |
| अहमदाबाद | ते | नवी दिल्ली | ६ | ,, |
| अजमीर | ते | नवी दिल्ली | ३ | ,, |
| जयपूर | ते | दिल्ली | २ | ,, |
| अजमीर | ते | जयपूर | २ | ,, |
| जयपूर | ते | अजमीर | [illegible] | ,, |

**जलद व सुरक्षित माल वाहतुकीसाठीं रेल्वेवर अवलंबून रहा.**

अधिक तपशिलवार माहितीसाठीं गूड्स सुपरिंटेन्डेन्स वाडीबंदर आणि करनाक ब्रीज यांना भेटा:—

**मध्य आणि पश्चिम रेल्वेज्**






अनुक्रमणिका




नव्या तऱ्हेची, उन्मेषयुक्त कथा वाचकांना नित्य नियमानें सादर करणें हें दीपावलीचें ध्येय ! गेल्या अंकांत असाच एक नवा प्रकार सादर केला. वाचकाचं मन ऊंचच ऊंच अंतराळांत घेऊन जाईल असा हा....

अ र विं द   गो ख ले

## १

सुकलेल्या नाल्यावर बांधलेला दगडी कठडा फारसा उंच नव्हता, पण सुभाष नि गंपूला खूप खटपटीनें त्यावर चढून बसावं लागलं. गुडघ्यांना घासटलं. चड्डीच्या खिशातली कवठं नि चिंचा काढून कठड्यावर ठेवाव्या लागल्या. चड्डी वर सरसावीत व नाक साफ करीत कसेबसें दोघेही वर चढून बसले.

मागे वळून पाहिलं तर पाणी दिसतहि नव्हतं. पावसाळ्यांत देखील जेमतेम ओहोळच वाहात असणार तिथून. होतं सगळं माजलेलं गवत, रानझुडपं नि त्यांतच पडलेलीं हाडं, टिनाची डबडी, कांचेचे फुटके तुकडे, एक चिंध्यांचं गाटोडं......माना मोडून दोघंहि पोरं कितीतरी वेळ तो खजिना निरखीत होते.

स्वतःशीच गात एक इसम दोन्ही हात सोडून सायकल चालवीत रस्त्यानें गेला आणि सुभाष गंपूचे लक्ष तिकडे वेधलं. तोल सावरीत नि बेसूर गात जाणाऱ्या त्या माणसाची दोघांना मोठी गंमत वाटली. तो दिसेनासा होईपर्यंत दोघंही त्या दिशेनें पहात राहिले. तो गेला नि कांहींच उरलं नाहीं. सगळं स्तब्ध, संपल्यासारखं झालं.

ती पोकळी असह्य होऊन गंपू म्हणाला,

" काय करायचं रे आतां—"

सुभाष कांहीं बोलला नाही. टेकडीवर भटकण्यांत खूप वेळ दवडला होता. कवठं नि चिंचा गोळा करण्यांत, एकदांडीची फुलं खुडून टिचकीनें बंदुकीसारखी उडवण्यांत, रस्त्याच्या कडेला हातमाग चालवणाऱ्या बायांचं काम पाहाण्यांत खूप मजा आली होती. अंग दमलं होतं, तोंड आंबलं होतं--पण सगळी गहिरी गंमत सोडवत नव्हती. पण आणखी काय करायचं ?--गांवाची वेस आली होती, दिवसही संपणार होता...

गंपूलाच तेवढ्यांत एक गंमत आठवली. म्हणाला,

" येस. बघ एक गंमत..."

" कसली रे ?—"

" 'किती वाजले ?' ची. खेळायचं कां "

सुभाषनें बाजूला थुंकून पसंती दर्शवली. दोघंही सरसावून व चेहेऱ्यावर भोळा भाव आणून तयारीत बसले.

संध्याकाळ व्हायच्या आंतच एक पेन्शनर फिरायला निघाले होते. पागोटें, गळ्याला मफलर, जुन्या चढावावर मोजे नि हातांत काठी. आपल्याच नादांत ते रस्त्याच्या मध्यभागातून जात होते. कठड्यापुढून जाऊं लागले तशी सुभाष एकदम म्हणाला,

" किती वाजले हो ? "







अनुक्रमणिका

पेन्शनर भयंकर दचकले. अंगावर मोटर आली असं वाटून गडबडले व मग भानावर येऊन म्हणाले, " अं-अं-वाजले ना-" खिशातलं घड्याळ काढून त्यांनी काटे पाहिले. 'साडेचार-साडेचार वाजून तीन मिनीटं—' कुणी विचारलं म्हणून भोवताली बघितलं व बाजूच्या चौथऱ्यावरील पोरांकडे मारक्या नजरेनें पाहिले.

ते गेले तसा सुभाषनें गंपूला डोळा घातला. गंपू जवळ सरकून, सुभाषच्या खांद्यावर हात टाकून बसला. दुरून एक सायकलवाला येतांना दिसला. तेव्हां घाईनें म्हणाला, " आतां मी—"

सायकलवाला धापा टाकीत पॅडल मारीत होता. कसल्यातरी काळजीत व्यग्र होता. स्वतःशींच पुटपुटत होता. गंपूनें तो समोर येतांच त्याला टिपलं. ओरडून विचारलं,

" साहेब, काय वाजले हो ?...टाईम काय झाला ? " वाक्य जुळवायला गंपूला वेळ लागला. तो इसम मराठी नसावा अशी शंका येऊन त्यानें 'टाईम' शब्द मोठ्यानें म्हटला.

" हाप पास्ट फोर—" घड्याळ न पहातां, मुलांकडे न पहातां तो माणूस उद्गारला व पुटपुटत, पॅडल मारीत पुढें निघून गेला. तो काय बोलला तें समजलं नाहीं. पण दोघंही पोट धरधरून हंसत राहिले.

दोन कॉलेज विद्यार्थी गेले. एक पोलीस गेला. भाजीचा भारा घेऊन एक सायकलवाला गेला. असाच एक साहेब गेला. सुभाष आणि गंपूनें प्रत्येकाला हटकलं नि नितळ काळजीनें विचारलं, " किती वाजले हो ?—" प्रत्येकजण थबकला व घड्याळ पाहून, वेळ सांगून गेला...वेळ जात होता. गडबडणाऱ्या, वेळ सांगणाऱ्या आणि लहान मुलांनी अडवावं, किती वाजले म्हणून प्रौढपणें विचारावं ह्या जाणीवेनें जरा रुष्ट होणाऱ्या वाटसरूंना दोघंही मुलं हसत होती. टोपी अडवल्याची गंमत उपभोगीत होती. तिरीमिरीनें चिंचा पाडण्यापेक्षां नि मास्तरांना चुकवून पळण्यापेक्षां ह्या खेळांत केवढी गहिरी गंमत होती...

" चल, जाऊं या—" गंपू कठड्यावरून खाली उडी घेत म्हणाला.

" कंटाळलास वेड्या...कसली मज्जा आलीय. आता आणखी लोक येतील बघ..." सुभाष गंपूची बाही खेचीत म्हणाला, " त्या जण्टलमनाचा तर काय मांजा उतरला. मनगट ऐटीनें बघतो—तों घड्याळच नाहीं...नि त्या भारेवाल्याला विचारलं तर कित्ती रागावला...ये रे..." त्या खेळांत सुभाष गुंगून गेला होता. गेल्या रविवारी चौकांत केळीची सालं टाकून जाणारे येणारे कसे घसरतात हें पहाण्याचा त्याचा डाव सफल झाला नाहीं—पण त्याहून मोठा खेळ मिळाल्याचा मिष्किल आनंद आतां त्याच्या डोळ्यांत खेळत होता.

गंपूला कांहींतरी अधिक उनसनाटी गंमत हवी होती. वेळ विचारणं हा काय खेळ झाला ? चिंचा खायला नि मोठ्या माणसांची टिंगल करायला तो काय लहान मुलगा थोडाच होता ? तो सुभाषला खाली ओढणार तेवढ्यांत एक जोडपं येतांना त्यानें पाहिलं. तो थबकला. पण हलकेंच म्हणाला, 'सुभाष नको—"

सुभाष पुढें सरसावून बघूं लागला. आंबल्या मळक्या चड्डीची व धुळीनें भरलेल्या केसांची त्याला क्षणभर लाज वाटली. त्या मुलाचा पायजमा काय कडक इस्त्रीचा होता ! झब्बा कसा बोळदार होता. सिनेमा नटासारखे त्यानं केस वळवले होते व जरा पुढेहि झुकले होते. आणि-आणि डाव्या हातानें त्यानें त्या नाजूक मुलीचं मनगट धरलं होतं. जिथें घड्याळ बांधलेलं असतं त्यावर त्याची मूठ होती. किती वाजले विचारायचं विसरून सुभाष त्या मुलीकडेच बघत बसला.

न बोलतां, पण एकमेकाकडे पहात नि लगटून चालत ते जोडपं मुलांच्या पुढून हळुहळू निघून गेलं. चिंचा कवटांतली सगळी चव घेऊन गेलं. डोळ्यांतला सगळा मिष्कीलपणा विझवून गेलं. गंपू नखं खात नुसता उभा होता. सुभाष हळुहळू खाली उतरत होता.

ते जोडपं नाहींसं होऊन बराच वेळ गेला. एक मोटी मालट्रक खडखडाट करीत व धुरळा उडवीत गेली अन् दोघं भानावर आलीं. डोळे चोळीत, नाक पुशीत एकमेकाकडे पाहूं लागलीं.

" घरीं जायचं ? "

" घरीं ? "

घरीं जायची दोघांनाही इच्छा नव्हती. आईबाप, भावंडं, चिडाचीड, अंधेर नि धूर, कंटाळा......

" कांहींतरी करूं या. "

" काय करायचं ? थेटरवर चित्रं पाहायचीं ? आयडीया—"

गंपूची 'आयडीया' सुभाषला फारशी आवडली नाहीं. पण तसंच कांहीं भडक, थरथरतं हवं होतं. खेळ नको, टिंगल नको—कांहींतरी गंमतीचं, गुप्तसं...

गंपूचं डोकं अशा बाबतींत नेहमी पुढें असे. पण आतां सुभाषला नेमकं, हवं तें सुचलं. " चल—", तो म्हणाला, " चल रे...चल म्हणजे सांगतो—" गंपूला जवळ जवळ ओढीतच तो म्हणाला.

" कुठें-सांग आधीं—" गंपू अडाण्यासारखा रस्त्यावरच थांबला. सुभाषनें त्याला कडेला नेलं नि कानांत सांगितलं,

" थेटरांत नाहीं...पण त्या बाजूच्या मुतारींत—"

" कशाला रे ?-हट्—" गंपू वांकडं तोंड करून म्हणाला.

" तिथें भिंतीवर लिहीतात ना—"

" आपण लिहायचं ?-नको रे बुवा—" भिंतीवर भलतं सलतं, घाणेरडं लिहायच्या कल्पनेनें गंपूला कापरं भरलं.

" नाहीं रे...पण लिहीलेलं असतं ना, तें वाचायला. खूप गंमत असते ते वाचायची—"

लिहीण्यापेक्षां वाचण्यांत गंमत असते हें गंपूला तात्काळ पटलं. त्या अक्षरांचा नीट अर्थ उमगत नसे. पण ते सगळं चोरटं, थरथरतं, गुप्त नि मोठे झाल्याची जाणीव करणारं असे, ह्यांत शंका नव्हती. असा चोरटा पण मोठ्या माणसांचा खेळ खेळायला गंपू एकदम आतुर झाला. नकळंत निघाला. सुभाष खूष होऊन त्याच्याहीपुढें धावूं लागला.








चिंचांनी पोट नि खिसे भरले होते. ते जोडपं मागें क्षितीजाकडे निघून गेलं होतं. थिएटर हाकेच्या अंतरावर समोरच होतं. त्याजवळच्या मुर्तरीमागच्या भिंतीवरचं लिहीलेलं वाचायला ती पोरं शेंबूड आवरीत व चड्डया वर ओढीत विलक्षण आतुरतेनें चोरटे चेहेरे करून धावत सुटली...

• • •



आयुष्याचा उतार आता सुरू झाला. गाडी उतरणीला लागली. उमेद गळून जाऊं लागली. आता कांहीं धडाडी धडपड दाखवायची, मोठ्या कार्याचा डाव मांडायचा, म्हणजे सतरादां विचार करावा लागणार. वय मोजावं लागणार, स्नायूंची ताकद मापावी लागणार. नदीचा सुसाट पूर, आगीच्या प्रचंड ज्वाला, काटेरी झुडुपावर उमललेले गुच्छ, क्षितीजावर दिसणाऱ्या सोनेरी सावल्या—ह्या सगळ्या स्वप्नामागें धावूं पहाणारं मन पांगळं होत जाणार.

तसं वय झालेलं नाही. शरीर थकलेलं नाहीं. मनाची बडबडही कमी झाली नाहीं. पण आता अचानक पोक आल्यासारखं वाटूं लागलं आहे. जपून पाऊल टाकावं, मागें बघावं व खूप पुढचं बघावं, अंग चोरुन बाजूनें जावं, सांभाळून राहावं असंच वाटूं लागलं आहे. परवां परवांपर्यंत सगळं ठीक होतं. दिवस अस्ताव्यस्त, सैरावैरा दवडले जात होते. कसली काळजी नव्हती, घपापणं नव्हतं. आताही तोच खाक्या चालू आहे.

आहार तोच. जेवतांना दोन वेळां भात, अडीच पोळ्या, दहादां चहा, उडपीकडचा वडा धीवन. कधी ब्रिज, कधी बॅडमिंग्टन. मुलांच्यावर मध्येंच आरडणं, पत्नीवर नियमित प्रेम दाखवणं, ऑफिसातल्या राजकारणांत घोटाळत राहणं. सगळं जिथल्या तिथें आहे. पण आतां एकदम सगळा वेग मंदावल्यासारखं वाटतंय.



आंतल्या आंत जाणवतंय कीं जपायला पाहिजे. ही धकाधकी आता जमायची नाहीं.

मुलं कालपासून म्हणत आहेत, सर्कसला जाऊं. सर्कसची मलाही आवड आहे. ट्रॅपिझ, वाघसिंह, विदुषक—पण सर्कसला म्हणे अतोनात गर्दी आहे. तिकीटासाठीं तोबा चालला आहे. मुलांना घेऊन त्या गर्दींत घुसायचं, धक्काबुक्की करीत तिकीटं मिळवायची नि मग फळकुटावर बसून तीनचार तास खेळ पाहायचा म्हणजे शहारेच येतात आतां. सर्कस येणार म्हणून जाहिराती लागल्या तेव्हां अशा गर्दीची कल्पना होतीच; तरीपण तेव्हां मीच मुलांना न्यायचं कबूल केलं होतं. मीच मूल बनलो होतो. पण आठवडा उलटला नि माझंच मन मरगळलं. मुलांचा उत्साहसुद्धां कसासाच वाटूं लागला. त्या उत्साहाचं भयही वाटूं लागलं.

गर्दी, रांगा, दाटी, धक्काबुक्की, मारामाऱ्या...सगळ्यासून बाजूला, कडेला रहावं अशीच मनाची टुसटुस परवापासून सुरू झालेली आहे. मारामारी होईल, अपघात होईल, खरचटेल, हातपाय मोडेल असंच मनानें दुखणं घेतलंय.

उगाचच उदास झालेंय. खिडकींत ताटकळत उभा आहें नि शून्यपणें बाहेर पहातों आहें. समोरच्या भिंतीवरची औषधांची जाहीरात कधीं नाहीं ती आज नजरेंत भरते व धोकादायकशी वाटते. संधीवात, मूळव्याध, दाढदुखी, निद्रानाश...बहात्तर रोग. उतारवयांत कुठला रोग शरीर पोखरेल-नेम नाहीं. कुठला तरी नक्की. आजच ह्या रोगांची नामावली समोर येते आहे इतके दिवस कधी हीं अक्षरं कधीं समोर आलीही नाहीत.

बॅग घेऊन दामुअण्णा घाईघाईनें चालला आहे. स्वतःशींच हंसतो आहे. त्यानें वर खिडकीकडे बघायला नको असं मन म्हणतं आहे. दामुअण्णा इन्शुरन्स एजंट आहे. आपल्या वृद्धापकाळांत व पत्नीच्या वैधव्यकाळांत...इन्शुरन्स, सर्टिफिकीटं...दामुअण्णा हंसतच पुढें जातो नि बरं वाटतं. तेवढ्यांत कोपऱ्यावरच्या देवळांतली कथा संपते व माणसं रस्त्यावर येतात. म्हातारी, वांकलेली, खोंकणारी...मन चरकते, मान आंत वळते...

अस्वस्थता. अकारण अस्वस्थता. बायकोला वाटतं, मला कणकण आली आहे. क्लबांत जा, फिरायला नाहीं तर सिनेमाला चलतां का, चांगला झणझणीत तिखटामिठाचा सांजा करते म्हणजे जिभेला चव येईल...ती उपाय सुचवते. सांजा खाऊन सिनेमाचा कार्यक्रमही होतो. पण तरतरी येत नाहीं...

केव्हांपासून असं वाटतंय...डॉक्टर खोदून विचारतात. नाडी, रक्तदाब-सगळं ठीक तर आहे!—मॅड आहेस, बॅडमिंग्टनंचे दोन सेटस् टाकूं कीं एकदम ओ. के. ...भाऊ म्हणतो. माझं मलाच ह्या पोकळ पोक्तपणाचं हंसूं येत आहे. काय हा चक्रमपणा. उगाचच दमल्यासारखं वाटतंय म्हणजे काय! रविवारी तर ब्रीज झालं, सोमवारी बॅडमिंग्टन, मंगळवारी सिनेमा, गप्पा...

कां असं वाटलं मग? कधीं?...दिवस, तास, मिनीटं मागें मागें उस्कटीत मी कारण शोधतो आहे. असं काय घडलं?—कधीं ही भावना आली? कुठें?...




बुधवारी सकाळीं तर मी लवकर उठलों होतो. सकाळपासून स्वगं म्हणजे खुषीतच होतो. मंडईत गेलो, येतांना मित्राकडे चहा घेतला. काकांचं पत्र आलं होतं. जेवलो नि सुपारी चघळत ऑफीसला निघालो. वाटेंत सायकलमध्यें हवा भरली नि सावकाश सायकल चालवीत-मजेंत निघालों ..

एखादा चित्रपट पहावा तसा मी प्रत्येक क्षणाचे, प्रत्येक हाल-चालीचे दृश्य नजरेसमोर आणीत होतों. मंगळवारी रात्रीपर्यंत सर्व ठीक होतं नि बुधवार पासून बरंचसं बिघडलं होतं. बुधवार सकाळ तर सरळ गेली. ऑफीसांत कांहीं विशेष घडलं नाहीं. ऑफीसला निघालों ते...

अन् मग अचानक फिल्म तुटल्यासारखं झालं. क्षणकाल अंधेरी आली. छातींतला टोला जोरानें वाजला. ती सायकल फेरी परत डोळ्यापुढें आणायची धडपड केली.

सायकल पिटाळीत कॉलनी ओलांडून बाजारच्या रस्त्याला लागलो. बाजार ओलांडला कीं मोकळी सडक. बाजार बराचसा मागें टाकून सिनेमागृहाजवळ आलों. कुठल्याशा सकाळच्या सिनेमाचा मध्यंतर झाला होता. प्रेक्षकांच्या झुमडी बाहेर लोटत होत्या. समोरच्या हॉटेलकडे, बाजूच्या शेंगाचण्यावाल्यांकडे चालल्या होत्या.

रस्ता गजबजला होता. त्यांतच टांगे उभे. एक मालट्रक मध्येंच अडून पडली होती. कांहीं सायकलस्वार त्या गर्दीतूनही सुळकन् जात होते.

मीही तसाच जायचा. घुसायला श्वास घेतलाही. त्यांत नवलाचं कांहीं नव्हतं. नेहमीचंच. पण एकदम काय वाटलं, काय झालं कोण जाणे! वाटलं, नाहीं जमायचं! नको. काय घाई आहे एवढी! उतरावं नि गर्दीतून वाट काढीत जावं. कशाला कसरत करा-यची. तोल सावरायचा, घंटी वाजवत राहायचं, ब्रेक्सवर हात ठेवायचे, ओरडायचं, प्रसंगीं शब्दाशब्दी करायची...

गर्दीच्या लाटा लागण्यापूर्वीच मी उतरलों. कसल्याही गोंधळांत सायकलला वाट काढण नेहमींचं—पण आतां चालत धक्के खात गर्दीतून पलीकडे गेलो. अन् मग गर्दी संपली तरी नकळत सायकल हातांत धरून चालत राहिलो.

मोकळा मार्ग लागला, मोकळा वारा आला आणि मी पायी जात आहे हे ध्यानांत आले. सायकलला धक्का देऊन त्यावर आरूढ झालों. सायकल धावूं लागली, पण मन पेंगळू लागले. गर्दीतून वाट काढण्याचं वय गेलं. तडफ गेली, सुटसुटीतपणा, चपळाई गेली. धक्काबुक्कीची धास्ती वाटली. पडेन, खरचटेल, पाय मोडेलही, उगाच बाचाबाची होईल...कुठं भांडायचं, कसली घाई आहे, कशाला एवढे तरुणासारखे...

स्वतःला समजावीत मी चाललो होतों. अन् स्वतःशी आश्चर्य करीत थबकत होतों. क्षुल्लक गोष्ट, पण...

तेव्हांपासून...तेव्हांपासून ?......

• • •





















"छेः छेः त्याची काळजी नको. स्त्री येऊं द्या, मग खेटरं आपोआप येतील." असं सांगणाऱ्या त्या

# माझ्या गुरुची विद्या



कृष्णचंद्र

नेहमींच मला दोन गोष्टींचं भारी आकर्षण. सुंदर पादत्राण व विलोभनीय स्त्री. या दोहोंचं काय नातं आहे कोण जाणे! पण माझ्या मनाला मोह घालणाऱ्या याच दोन गोष्टी. माझ्या पायांत नक्षिदार-नाजुक-मुलायम चपला नसतील तर समोरचं ताडाचं झाड मला तुळशीएवढं खुजं वाटतं आणि—आणि माझ्या डाव्या कुशींत एखादी इंद्रायणी नसेल तर भर दुपारीं बारा वाजतां मला रात्रीचा अंधकार भासतो.

पण आपणाला हवी असलेली गोष्ट आपणाला नेहमीं मिळते असं थोडंच आहे! पुष्कळांना विमानांतून प्रवास करावा असं वाटतं पण असं वाटणारांपैकीं ९९॥ टक्के लोकांना एअरोड्रोमवर जाऊन विमान पहाण्याचं भाग्यपण मिळत नाहीं. कांहीं लोकांना बोटांत हिऱ्याची झकपैकीं आंगठी घालावी असं वाटतं. पण असं वाटणारांपैकीं किती जणांच्या बोटांत हिऱ्याची आंगठी असते?—हिऱ्याची सोडा, साधी चांदीची असणंहि मुष्किल होतं. पायांत चांगला जोडा असावा असं पुष्कळांना वाटतं पण प्रत्यक्षांत तो जोडा पायांऐवजीं डोक्यावर जाऊन बसतो. एकेकाचं नशीब झालं!

तुमच्या नशिबांत कांहींहि असलं तरी तुम्ही प्रयत्न करतांच. निराश होत नाहीं. मीहि निराश न झाल्यामुळें माझ्या प्रयत्नांचा एक भाग म्हणून श्री. गोपाळकृष्ण गणपुले यांच्याकडे उपदेश घ्यायला गेलों.

ह्या गोपाळकृष्णांचं वय तीसपासून पन्नासपर्यंत कोणतंतरी असावं. त्यांच्या शरीराची ठेवण आणि मेकअप् यावरून निश्चित वयाचा अंदाज करणं कठीण! त्यांचं वय कोणतहि असलं तरी त्यानीं अजून विवाह केलेला नव्हता ही गोष्ट सत्य आहे. त्यांचं मासिक उत्पन्नहि चांगलं असावं. असामी ठीकठाक रुबाबांत रहातोय्. त्यांच्या पायांत नवनवीं पादत्राणं व हातांत नवनव्या स्त्रिया वारंवार दिसतात. मला आवडणाऱ्या दोन्ही गोष्टी.

त्यांची छोटी ऑस्टिन गाडी माझ्या घराशेजारीं नेहमीं उभी असते, कारण गोपाळबाबू माझ्या घराशेजारींच रहातात. साहजिकच अशा तालेवार असामीची ओळख व्हावी ही इच्छा व जुळल्यास ते कोणत्या रस्त्यानें गेले त्याची विचारपूस करावी ही जिज्ञासा. या दोन कारणांनीं मी त्यांच्या घरीं गेलों; आणि माझी इच्छा त्यांना कथन केली.

माझी गोष्ट ऐकून व डोळे मिटून थोडा वेळ विचार केल्यावर ते म्हणाले,

"मला वाटतं तुम्ही प्रेम करावं!"

"कशावर—वहाणांवर?"

"छेः छेः स्त्रियांवर." गोपाळकृष्ण हंसत हंसत म्हणाले, "कोणातरी सुंदर तरुणीवर प्रेम करा."

"पण आमच्या गल्लींत तर कोणी सुंदर तरुणी नाहीं." मी शंका प्रदर्शित केली.

"असं कसं म्हणतां?" गोपाळकृष्ण म्हणाले, "आपण एखाद्या योग्य अशा तरुणीवर प्रेम करावयास सुरवात करा आणि तिच्याकडे पहा. ती तुम्हाला रतीसारखी सुंदर भासेल."

"बरं पण गुरुजी, त्या वहाणांचं काय?" मी शंका प्रदर्शित केली.

"त्याची काळजी नको—स्त्री येऊं द्या मग खेटरं आपोआप येतील." गोपाळकृष्ण म्हणाले.

गोपाळकृष्णांचं म्हणणं खरं होतं. आजपर्यंत माझ्या शंकेचं निरसन कोणी केलं नव्हतं—मला मार्गदर्शन केलं नव्हतं—किंकर्तव्य(!) झालेल्या मला आज गोपाळकृष्णांनीं प्रेम-गीता शिकविली. आजपासून ते माझे गुरू.

दुसऱ्याच दिवशीं मी मारवाड्याकडून कर्ज काढलं व थोडीशी मिठाई-पेढे-फुलं वगैरे घेऊन मी माझ्या गुरुमाऊलीकडे गेलों. तें सारं त्यांच्या चरणावर ठेवलं व म्हणालों—

"गुरुजी आजपासून मला आपला शिष्य मानावं आणि प्रेम करण्याचा दरवाजा मला दाखवावा."

आचार्य गोपाळकृष्णानीं माझ्या डोक्यावर हात ठेवला व धीरगंभीर आवाजांत ते म्हणाले, "बेटा प्रेम हें सुद्धां एक शास्त्र आहे; आणि या शास्त्राचे दोन भाग आहेत. एक थिअरी व दुसरा प्रॅक्टीकल—"

"गुरुदेव हें कठीण शास्त्र शिकण्यासाठीं मी आपणाकडे आलों आहे." मी नम्रतापूर्वक म्हणालों.

" ऐक " गोपाळकृष्ण म्हणाले, " प्रेम करण्याचे मुख्य प्रकार दोन आहेत. एका प्रकारांत आपणाकडे भरपूर पैसा असावा लागतो. पैसा असल्यावर प्रेमाचा कठीण मार्ग मऊ मुलायम बनतो. दुनियेंतील साऱ्या सुंदरींचीं हृदयं मऊ मुलायम असतात. आणि त्यांना जर का तूं कॅडिलॅक गाडी—उंची सिल्कसाडी—हिऱ्याची आंगठी, असं कांहीं प्रेझेंट दिलंस तर ती हृदयं जवळ जवळ वितळावयास लागतात. आणि सहजिकच त्या वितळणाऱ्या हृदयाबरोबर त्याची मालकीणहि आपलीच होते. "

" गुरुमहाराज " मी निराश होऊन म्हणालों, " मी एक गरीब लेखक आहे हें विसरूं नका. लेखनावर मला मासिक शेपन्नास रुपये मिळतात. शिवाय मी एका दैनिकाचा सहसंपादक आहे. तिथं मला एकशेंवीस रुपये मिळतात. एवढ्यांत मला माझी वृद्ध आई—तीन अविवाहित बहिणी—दोन विधवा मावश्या आणि त्यांचीं सात अपत्यं एवढा परिवार सांभाळायचा आहे. तेव्हां मी साडीसुद्धां जिथं घेऊं शकणार नाहीं तिथं कॅडिलॅक गाडीची गोष्ट कशाला ? "

" ठीक आहे बेटा ठीक आहे. " विचार करीत गोपाळकृष्ण म्हणाले, " तर मग तुझ्यासाठीं मी दुसरी युक्ति सांगतों. "

" सांगा सांगा लौकर " मी अधीरतेनें म्हणालों.

" प्रेम संपादनाच्या या दुसऱ्या प्रकारांत खर्च फार थोडा, जवळ जवळ कांहींच नाहीं—पण इथं अभ्यास फार करावा लागतो. डोकं वापरावं लागतं—निष्काळजी राहून भागत नाहीं. " गुरुजी गंभीरपणें म्हणाले.

" गुरुमहाराज वाटेल तेवढी मेहनत करायला मी तयार आहे. त्याबद्दल तुम्ही बेफिकीर रहा. फक्त नक्की मी काय करूं तेवढं तुम्ही सांगा. "

" ऐक तर मग—स्त्रियांना ज्याप्रमाणें मोटार-बंगला—सुंदर वस्त्रं आवडतात त्याच-प्रमाणें त्यांना गोड गोड बोलणारे आणि सुंदर दिसणारे तरुणहि आवडतात. सुंदर असणं ही कांहीं आपल्या हातांतली गोष्ट नाहीं. आतां तुझंच पहा—तें अरुंद कपाळ, चपटं नाक, तेलकट काळा रंग आणि ठुसका बांधा या सौन्दर्याच्या अभावाला तूं काय करणार ?—"

" महाराज, " मी आंबट तोंड करीत म्हटलें, " मी माझ्याइतक्या सुंदर स्त्रीवर प्रेम करायला तयार आहे. फक्त पुढचं तेवढं तुम्ही सांगा. "

गुरुमहाराजांनीं डोळे बंद केले व पांच दहा मिनिटं कसलं तरी मनन केलं. नंतर थोड्या वेळानं त्यांनीं डोळे उघडले व हंसत हंसत ते माझ्याकडे पहात म्हणाले, " बेटा, उपाय सांपडला आणि तुझी देवताहि सांपडली. तूं पलिकडच्या चाळींतील विमल-वर प्रेम कर. "

" विमलवर ? त्या कॉलेजमध्यें जाणाऱ्या मुलीवर ? "

" हाव तिच्यावर—तिला आवड आहे ती सुगंधाची—अत्तराची. उंची उंची अत्तरं घेण्याचा तिला नाद आहे. आणि तिला सर्वांत जास्त आवडतं तें ईव्हनिंग इन् पॅरिस. त्या सेंटवरुन ती जीव कुर्बान करील—तेव्हां तूं असं कर. बाजारांतून ईव्हनिंग इन् पॅरिसची एक बाटली खरेदी कर व तुझ्या रुमालाला तें सेंट चोपड. मग तो रुमाल तुझ्या खिशांत वरती ठेव. आणि असा टाकटीक झाल्यावर, ती कॉलेजांत जाण्या-साठीं बाहेर पडण्याची वाट पहा. ती रस्त्या-वर दिसतांच तिच्याकडे पाहून स्मित कर. तुझं हसणं पाहून तीहि हसेल. कदाचित् न पाहिल्यासारखंहि करील. कांहीं झालं तरी घाबरूं नकोस; तूं मात्र स्मित करीत झटपट तिच्यापुढं जा. आणि थोडासा पुढें गेल्यावर खिशांतील रुमाल रस्त्यावर पाड पण असा बेतानं कीं तूं तो मुद्दाम टाकला आहेस हें तिला कळतां नये. रुमाल पडलेला पहातांच ती झटकन् पुढें येईल व रुमाल उचलील आणि तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडण्यापूर्वींच त्याचा सुगंध तिचं मन भारून टाकील, मग ती तुला हाक मारील आणि तूं मागें पहायचं, जवळ येऊन ती तुझा रुमाल देईल. Thank you म्हणून तूं तो घ्यायचा साहजिकच त्याविषयीं कांहींतरी बोललं पाहिजे आणि विमल तुला विचारील "तुम्हाला ईव्हनिंग इन् पॅरिस आवडतं वाटतं ?" गोष्टीनं गोष्ट वाढत जाईल आणि ती ईव्हनिंग इन



पॅरिसची बाटली तुम्हां दोघांच्या हृदयाचा पूल ठरेल."

मी आनंदाने आणि अभिमानाने गुरुजींचा हात हातांत घेतला व म्हटलं "गुरुजी किती सुंदर ! मी उद्याच याचा प्रयोग करतो."

उद्यां संध्याकाळीं काय झालं तें मला सांगायला यायला विसरूं नकोस."

"जरूर"

÷ ÷ +

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं जेव्हां मी गुरुजींच्या घरीं पोचलों तेव्हां माझ्या उतरलेल्या चेहऱ्याकडे पाहून त्यानीं अंदाज बांधला की कांहींतरी घोटाळा झाला आहे.

"काय झालं, हंसायला विसरलास कीं आणखी कांहीं ?" त्यानी विचारलं.

"हंसलों मी – पण काय झालं कुणास ठाऊक ? तिच्याकडे हसत हसत पहात होतों पण तिला मात्र राग आला असावा, कारण तावातावानें ती पुढें चालली."

"मूर्खा तिच्यापुढें तुला जायला मी सांगितलं होतं ना ?"

"माझं म्हणणं आधीं ऐका" मी म्हणालों "मी इतक्या जोरानें चाललो होतो की तिला गांठण्यासाठीं मला पळावं लागत होतं तरीहि मी पळत पळत तिच्यापुढें गेलों आणि माझा रुमाल खालीं टाकला. तिनं तो रुमाल उचलला."

"शाब्बास !" गुरुजी म्हणाले "बरं पुढें ?"

"पुढें—तिनें तो उचलून एक क्षणभर पाहिला व वेडंवाकडं तोंड करीत बाजूच्या गटारांत फेकून दिला."

"अस्सं !—तूं त्या रुमालाला ईव्हनिंग इन् पॅरिसला लावलं नव्हतस का ?"

"लावलं होतं तर ! पण—पण माझी एक संवय आहे. मी रुमालानं माझं नाक साफ करतो–घाम टिपतों...ईव्हनिंग इन् पॅरिसबरोबर कदाचित् तिला माझ्या घामाचा वासहि आला असेल. नाक—"

"समजलं समजलं" गुरुजी म्हणाले, "मूर्ख–महामूर्ख आहेस तूं. चांगला परीट घडीचा रुमाल घ्यावा एवढी साधी अक्कल नाहीं तुला ? अतां बस जन्मभर रडत, विमल तर गेलीच–"

मी लगेच गुरुमाउलीचे पाय धरले व म्हटलं, "महाराज गरीबावर असा राग करूं नका. तुम्ही सांगाल तें मी ऐकेन." खूप विनवणी केली तेव्हां कोठं त्यांचा राग शांत झाला, व थोड्या वेळानं ते म्हणाले "ठीक आहे कांहीं घाबरूं नकोस. तुला आतां प्रणयशास्त्रांतला तिसरा धडा शिकवतों."

"तिसरा धडा ? सांगा सांगा कोणता तो !" मी अधिरपणें त्यांना विचारलं.

"त्या तिसऱ्या प्रकाराला शक्तिशाली प्रेम म्हणतात."

"शक्तिशाली प्रेम ?"

"होय शक्तिशाली प्रेम. इथं बुद्धीचा कांहीं उपयोग नाहीं, तुझ्यासारख्या बुद्धिहीनानां हा मार्ग फार श्रेयस्कर."

"मग तो श्रेयस्कर मार्ग मला लौकर सांगा महाराज." मी विनवणीच्या स्वरांत म्हटलं.

"ऐक तर. तुला आवडेल अशी कोणतीहि एक छोकरी निवड. ती एकटी कुठं भेटेल याचा अंदाज घे. एकटी दिसली कीं तिच्याजवळ जाऊन मोठ्या प्रेमानं तिचा हात पकड. कदाचित ती हात झिडकारील, तर दोन्ही हातानीं तिचा हात पकड. आणि तरीहि ती निसटण्याचा प्रयत्न करूं लागली तर जोरानें तिला छातीशीं घट्ट धर आणि जर का ती आरडाओरड करण्याचा प्रयत्न करूं लागली तर तुझं तोंड तिच्या तोंडावर ठेवून तें बंद कर. एव्हांना तुझं काम फत्ते होईलच. पण जर यदाकदाचित् ती तरीहि दंगामस्ती करूं लागली तर तिला एक थप्पड मारून जमीनदोस्त कर, कीं बास्. विजय तुझाच. कोणतीहि स्त्री शेवटीं मर्द पुरुषाला शरण जातेच."

गुरुजींचा तो सल्ला आचरणांत आणला आणि—आणि आज मी तुरुंगांत आहे. तुरुंगाच्या गजाआडून मी हें लिहीत आहें. माझ्या 'शक्तिशाली' प्रेमप्रयोगांत मी अयशस्वी झालों हें सांगणें नलगे.

जरी हें खरं असलं तरी मी हिम्मत सोडलेली नाहीं, माझी सहा महिन्याची सजा संपतांच मी माझ्या गुरुजीनां भेटेन व त्यांना चौथ्या उपायाची माहिती विचारीन......

अनुवादः—**श्रीकृष्ण ठाकूर**





अनुक्रमणिका

# लोकगीतांतील स्वागत

महाराष्ट्राचीं लोकगीतें म्हणजे रांगड्या मऱ्हाटी मनाचें तेजस्वी आणि रसरसीत प्रतिबिंब. मराठी मन एखाद्या अप्रिय गोष्टीचा धिक्कार ज्या तीव्रतेनें करतें त्याच तीव्रतेनें अंतःकरण ओंवाळून एखाद्या मंगल घटनेचें स्वागतहि करतें.

---



डॉ. सरोजिनी बाबर

माझ्या वहिणीला पहिल्यांदा मुलगी झाली. अशी वार्ता कानावर आली त्यावेळीं नाना प्रकारच्या संमिश्र भावनांनीं जीव उजळून निघाला. त्या नव्या बाळाच्या स्वागताला मी माझ्या काळजाची पहिली पायघडी घातली आणि आनंदानं माझे ओठ बोलले—

| | |
|---|---|
| आंबा मोहरला | मोहरला पानोपानीं |
| आज दारीं उगवली | शुक्राची चांदणी |
| लेकापरीस ग | लेक कशानं झाली उणी |
| ऐक ग शेजीबाई | हिरा नव्हं ती हिरकणी |
| लाडकी झाली लेक | लाड करूं मी कशाचा |
| खेळायाला आणितें | चंद्रमा आकाशींचा |
| घागऱ्या घुंगूरांनीं | माझी दणाणेल आळी |
| माझी खेळे चाफेकळी | घरीं दारीं |
| बाहुली-बुंडूकली | भिंतीशी उभी केली |
| खेळणार माझी आली | चंद्रकला |

जीव अगदीं हारखून गेला. घरांतील नवीं रेशमी फडकीं मी पेटींतून बाहेर काढलीं. भराभरा सुईदोरा घेतला. एक लहानगी कुलाई शिवली. एक लहानगं बाळुतं शिवलं. आणिक एक लहानगं झबलं घेतायला घेतांना माझा जीव मोहरून आला. भावगंगेला उधाण आलं. प्रेमामृताच्या शिडकाव्यानं मी या नव्या बाळाच्या स्वागताची तयारी करूं लागलें. तशी माझी मीच खुषीनं स्वतःशीं म्हणालें—

| | |
|---|---|
| अंथरुण करीन मी | जाईमोगऱ्याचं |
| माझं बाळ नवसाचं | साजिरं गोजिरं |
| अंथरुण केलं बाई | मऊ ऊबदार |
| झोप घे चारी प्रहर | तान्ह्या बाळा |
| रंगीत पाळणा | त्याला रेशमाची दोरी |
| हालवीतें नानापरी | लाडकीला |
| पालख पाळणा | हत्तीणी दांताचा |
| वर चेंडू मोत्यांचा | चिमणीला |
| माझी लाडकी ही | देवाघरींचें मंगल |
| अमृताचें हें फळ | माझ्या घरीं |

आणि मग लेकीला भेटायला निघालें. वाऱ्याच्या पायानं, फुलांच्या उल्हासानं, प्रीतीच्या दरवळानं, मायेच्या ओढीनं आणिक हिऱ्या-माणकांच्या तोलानं अशी निघालें.

त्यावेळीं सूर्यदेव उगवला होता. कमळं फुललीं होतीं. मोत्यांच्या तेजानं रस्ता शिणगारला होता. पांखरं चिवचिवत होतीं. तालासुरांत गीत होतीं. घरोघरींच्या जात्यांनीं गुंजारव घातला होता—

| | |
|---|---|
| उगवला नारायण | लाल शेंदराच्या कोर्डी |
| लाडक्या लेकीला | औक मागीनं वाडीदिंडी |
| उगवला नारायण | माझ्या अंगणीं प्रकाशला |
| हळदी कुंकवाचा | वटा शालूचा माखला |

त्या कारणानं मी फुलासारखी हलकी होऊन धांवत होतें. लेकीला भेटायला जीव हारखला होता. उतावीळ झाला होता.

आणि त्याच घालमिलींत जेव्हां मी माझ्या वहिणीची लेक बघितली, तेव्हां मी खुळीभैरी झालें. गोरीनं माझं मन पकडलं. मला लेक आवडली. ते बघून माझी भावजय थट्टेनं बोलली कशी.

"दिवाणसाब, सून कशी आहे माझी ?"

तशी मग मला एकदम वाचा फुटली

| | |
|---|---|
| नवरी माझी बाई | कांय पहातां नवरीस |
| | सोनं जडवीलं मोहरीस |





अनुक्रमणिका

नवरी पहायाला आले कोण बाई किती
लेक पाणीदार मोतीं
नवरी पहायाला येऊं दे गडाचे गणपति
भांग तुज्या लक्ष मोतीं
नवरी पहातां ग वैनीबाई तूं होशी दंग
नवरी आरशाचं भिंग
नवरी माझी बाई जशी चंद्रम्याची कोर
मला नाहीं तिचा घोर

त्यामुळं दांताखालीं पदर धरून आलेलं हंसूं दावीत माझी बहीण बोलली, " मला लग्नाला बोलवा हं ! " तशी मग हंसण्यानं खोली दुणाणली. आम्ही मग लोळण फुगडी घातली. आणि अखेर शेवटीं आणखी एकमेकींच्या खोड्या काढायचा बेत करणार तर अशी आजी खेसकली कीं, आम्ही मग तिथून पळता पाय घेतला. मी आणि वहिनी सरळ घरीं आलों...

आणि सांगायचं म्हणजे मग माझ्या मधल्या भावाचं लग्न ठरल्याची गोष्ट बाबांनीं दुपारच्या वेळीं आम्हाला ऐकवली तशी जवळचा मुहूर्त काढायची भाषा आईनं केली. त्यावेळीं खरंच आमच्या वहिनीनं गव्हाचं दळण काढलं आणि ओव्या गायचा अगदीं सपाट्टा लावला—

मांडवाच्या दारीं हळदीबाईचं वाळवान
नवऱ्या बाळाला केळवान
मांडवाच्या दारीं घोडा नाचतो थयथया
नवरा उठना पाणी न्हाया
मांडवाच्या दारीं हलग्या शिंग्याची एक घाई
नवरा कळशी पाणी न्हाई
मांडव घातीला ग सये निचाळ जाईचा
छंद नवऱ्याच्या आईचा
सारविल्या भिंती वर काढील्या गवळणी
घरीं हौसच्या मावळणी
थोरात्रा नवरा ग अब्दागिरीनं झाकीला
पाय तोड्याचा देकीला
वाजंत्री वाजत्याती पानमळ्याच्या टिपरीखालीं
नवरा सोन्याच्या छत्रीखालीं



तेवढ्यांत अंगणांत आभाळ गडगडलं. पावसानं फळी धरली, म्हणून मी घाईगडबडीनं वाळत घातलेले कपडे घरांत घेतले. शेरडीला दारांतून काढून गोठ्यांत बांधली. वैरणीचा भारा म्हशीपुढं सोडला. अंगणांत पहार टाकली. आणि घासलेली भांडी न्हाणींत नेऊन धुणार तर वहिनीनं नवा साद घातला —

देवा माझ्या मेघाजीनं सूर्यासमोर डेर दिल
पाऊस पावण दारीं आल
मेघरायचं लगीन ग ढगांचा वाजे डफ
आली नवरी झपझप
मेघरायाचं लगीन ग ढगांचा त्या मांडवात
ईज नवरी चकाकत
पाऊस पडला ग मोत्या पवळ्यांच्या धारा
सुगी आली बाई घरा
पाऊस पडला ग नका करूंसा गलबला
धरनीबाईचा पति आला

म्हणून मग हातांतला तांब्या तसाच त्या घासलेल्या भांड्यांवर पालथा केला आणिक वहिनीजवळ जाऊन बसलें. तिला विचारलं, " लई गीत गातीस आज ? "

तशी ती नवा घास जात्याच्या तोंडांत भरवीत म्हणाली कशी, " का वो ? घरांत लगीन निघालंय न्हवं ? "

" अं ! अजून अवकाश आहे. "

" मग ? आत्तापसनं करीन तेव्हां कुठं वेळेला होईल. "

" कुठं जाणार आहेस वाटतं माहेरीं ? "

" आत्तां ? "

" हं ! "

" छे ! थोरल्या वन्संच्या लेकीला सांजा करायला रवा काढतेंय. बघा बाई ! "

" अस्सं ! "

" दादाला पण सांजा आवडतो. "

" केला कीं सगळ्यांनाच होईल. "

" अग ना वहिनी ? "

" काय हो ? "

" दादा कीं नाहीं काल म्हणत होता... "

" काय म्हणत होते ? "

" तुला भाऊच्या लग्नांत चंद्रहार करायचा. "

" अगबाई !... "

चंद्रहाराचं नांव काढलं तसं वहिनीनं मंदावलेलं जातं जलद गतीनं ओढलं आणि ती गाऊं लागली–

दागिना मागत्यें हौशा तुम्हापाशीं
जन्मोजन्मीं ठेवावी दासीला पायाशीं
दागिना मागत्यें कधीं नाहीं म्हणूं नका
पत्नी प्रेमाची भुकेली नको तिला पैसा अडका
नको मज बिंदी नको चंद्रहार
पुरे एक अलंकार मंगळसूत्र






देई देवा मज हळदीचं तेज
कुंकवाचं राज्य जन्मभरी
माझे चुडेयांचं सोनं आहे सुरतेचं
वडिलांच्या पारखीचे पतिदेव

आणि मग तिनं मला सांगितलं, " घरांत निघालेल्या लग्नाचं स्वागत नव्या दागिन्यानं करूं नाहीं. हौसेनं करावं. नवऱ्याच्या प्रेमाला वाढ लावीत करावं. कष्टानं घर सजवावं. हंसतमुखानं जगवावं. "

तितक्यांत आई आली. आक्कानं बोलावलंय म्हणाली. म्हणून मग मी वहिनीनं घटकाभरांत केलेला गरम गरम सांजा घेऊन आक्का-कडे गेलें. तिला सांजा दिला. तिच्या बाळाला मांडीवर घेऊन बसलें...

बाळाच्या रूपानं मी हारखून गेलें. लेक माझी नक्षत्रासारखी होती. इवल्या इवल्या डोळ्यांची, नाजुक जिवणीची, गोऱ्या अंगाची, भुऱ्या केसांची, मऊ रेशमी हातापायांची, बारीक नाजुक ओठांची अशी माझी लेक. तिनं नुसते डोळे उघडले. टकांमकां बघितलं. माझी गडे तहानभूक हारपली. मी म्हणालें, " यंदा माझ्या घरीं पंचमी नखऱ्यानं येणार. " म्हणून तिला जोजवीत गुणगुणलें कशी—

श्रावन हुंकारी हुंकारी । करू ग पंचिम साजरी
या बाई पंचमीची साडी । आणील मामा जरिकाडी

त्यामुळं माझी बहीण बोलली, " तिला मुंईतून वर तरी येऊं दे कीं ग ! लगेच पंचमी खेळायला निघालीस तें ? "

पण मी तिच्याकडे लक्ष दिलं नाहीं. मी माझ्या मनांत या लेकीचा भोंडला उभा केला. पानंफुलं आणलीं. फळं मिळवलीं. हत्ती काढला. खिरापत केली. मुलीबाळी जमवल्या. आणि लेकीचा हात आपल्या हातांत धरीत मी पोरींना गाणं सांगितलं—

वाजे चौघडा रुणझुण आला ग हादगा पावणा
दारीं तुळस दवणा ॥
जाईजुई शेवंती दुपारी फुले ग नानापरी
हार गुंफितें कुसरी वाहातें मी हादग्यापरी
हादगा देव मी पूजीतें ॥
लवंगा सुपाऱ्या वेलदोडे करून ठेवले वीडे
आणलीन् दुधांतले दुधपेडे वाहातें मी हादग्यापुढें
हादगा देव मी पूजीतें ॥

आतां मात्र आमच्या वहिणीनं मला खुळ्यांत काढली. पण म्हणून मी बरमलें नाहीं. उलट खिरापतीचाच सांजा तिला दिला असं म्हणून मी बाळाचा पापा घेतला आणि म्हटलं, " हिचं नांव चंद्रकलाच ठेवायचं. "

मग ती बोलली, " वाटेल तें ठेवा. "
" असूं दे हेंच. आई म्हणतीय. "
" मला पसंत आहे. "
" नांव काय घेशील बारशा दिवशीं ? "
" ये, तूं गप्प हं ! "



अनुक्रमणिका

" वा ! सांग कीं ! "

" कारण ? "

" चांगलं घे. सासू येईल. माहेरचा रुबाब सांग. "

" कसा ग ? "

" पाळणा विणला मोत्यानं, रेशमानं विणली बाज...असलं असलं कांहीं म्हण. "

" मग काय होईल ? "

" आई हारखेल. "

" म्हणीन. "

बहिणाबाईन होकार भरला तशी मी तिची लेक तिच्या पुढ्यांत ठेवली. आणि घरीं जायला निघालें. म्हणून मग ती बोलली, चाललीस कुठं ? "

" कां ग ? "

" बैस. सांभाळ हिला. मला निजूं दे. "

आतां आली का पंचाईत. नाहीं तरी कशी म्हणूं ? हिला दवाखान्यांत ठेवलेली. जवळ कोणी घरचं नको ? बसलें न् काय मग !

पण गंमत बघा हं ! बसलें तर डोळ्यांत बारसंच हं ! बाळाला सरीबिंदली घडवायची मला ओढ. म्हणून मी बघितलेली नक्षी आठवूं लागलें तर दरवर्षी घरांत येणारी 'महालक्ष्मी'—गौर— माझ्या नजरेंत भरली न् मग—

माझ्या बाळोचं चांगुलपन ग । जसं केवड्याचं पान
बाळ्या बुगड्यांनीं भरल कान ग । बाई कापाला सोडवान
काप घेतील विकयीत ग । नाकीं सुरव्याची नथ...

हें गाणं मनांत आलं. पण मग तें मोठ्या बाईच्या दागिन्यांचं म्हणून आधंच सोडून दिलं न् मग लेकीला समोर ठेवीत मला दुसरी याद आली—

सूर्यासमूक माजं घर ग ।
बाई मी लोटीतें घरदार
पायीं साकळ्या तंगभार ग ।
बोटीं मासूळ्या झिनकार
कमरीं दाबाला चारी कुलपं ग ।
गळीं पुतबिळ्याची माळ
वर चिताक नक्षीदार ग ।
चंद्रहाराचं पांच फेर
चमकी नाकांत डौलदार ग ।
काप कानांत गजबार
डोकीं केवडा मारी ल्हार ग ।
चोळी अंगांत हिरवी गार
नेसली पिवळा पितांबर ग ।
हातीं सोन्याचं बिलवार
मी ग निघालें न्हवयित्ता ग ।
लेक कुनाची तालीदार

आणिक लहानपणचं माझंच कौतुक मीं लेकीच्या अंगावर बघत राहिलें...

## तरीहि संयुक्त महाराष्ट्र झालाच !......४



'सं. महाराष्ट्राची चळवळ ही आकुंचित होण्याची चळवळ आहे.'
इति आ. विनोबा भावे

पण मग माझीच नजर बाळाला दृष्ट करील म्हणून मीं खालीं वळवली आणि तिथून उठलें. खोलींतून उगाचच येरझाऱ्या घातल्या.

त्यावेळीं मला यंदाच्यासालीं घरांत दाबून पीकपाणी आल्यामुळं या बाळाला दोन तोळ्याची सरी बिंदली करायचा बेत मी मनांत ठरवला. आणि मग जन्मोजन्मीं अशीच संपत्ति घरांत नांदावी म्हणून मी लक्ष्मी आईला-धनसंपत्तीच्या देवीला—हात जोडीत मनांतल्या मनांत प्रार्थना केली —

लक्ष्मी आई आली — तूं ग आल्थाली जाऊं नको.
धरला पालव सोडूं नको.
लक्ष्मी आली आई — आली बैलांच्या बाधनकीं
मी ग धड्यानं सोनं जोकी
लक्ष्मी आई आली — धर माज्या ग हातायाला
दोघी जाऊंया शेतायाला
लक्ष्मी आई आली — हातीं तांब्या ग अमृताचा
वाडा दावीतें अमृताचा
लक्ष्मी आई आली — मोत्या पवळ्यांनीं वटी भरा
दिव्याची वात सारा

मग मात्र मला एकदम बरं वाटलं. आणि कां कुणाला ठाऊक त्यावेळीं ही मुलगी खूप विद्या शिकणार अशी माझी खात्री झाली. म्हणून मी कौतुकानं तिच्या ओठावर सरस्वति खेळावी या भावनेनं मोठ्यानं बोललें—

पोथी पुस्तक वाचतांना — कानींचा झूल हाले
बाळ कागदासंग बोले
पोथी नि पुस्तकाचा — बाळे मांडीला झालं वज्जं
लाडके गिन्यानी हुरदं तुजं
मोठ नि मोठ डोळ — सये राघूचा रतनाच
वाची कागद वतनाच

त्यामुळं आक्काला जाग आली. आणिक तिनं मग रागानं मला बोलून घेतलं, " सारखी काय ग बडबड ? तूं जा घरीं. जरा झोपलें तर..."

तितक्यांत आई आली म्हणून मी तेथून पाय काढला. सरळ घरीं निघून आलें. झाली गोष्ट वहिनीला बोललें. आणि वहिनीला सातवा महिना होता म्हणून पुटपुटलें, " काय नको आक्काचा रुबाब. रागावली काय ? थांब. आतां वहिनीला बाळ झालं कीं, तें खास आमचं होईल..."

त्यावर वहिनी म्हणाली, " असं नाहीं बोलू. आत्या न् मावशी सारखीच प्रेमाची बाळाला—" आणि मग तिनं तो विषय तिथंच सोडून दिला. पण मी खट्याळपणानं आजी बोलते त्या ओव्या तिच्या पुढ्यांत टाकल्या—



अनुक्रमणिका

गरभार नारी गर्भच्छाया तोंडावरी
हिरवी चोळी दंडावरी वहिनीबाई
आंबे आले पाडा चिंचबाई कधीं येशी
डोहाळे पुरवीशी वहिनीचे
पहिल्यानं गरभार कंथ पुशीतो गोष्टींत
हिरवें डाळींब ओटींत वहिनीच्या

पण मग एकदम माझा जीव काळवंडला. वहिनी बाळंतपणाला माहेरीं जाणार होती ! म्हणून मी हिरमुसलें. पण वहिनीला कोण आनंद झाला. ती हारखून पुटपुटली—

माझें हे कीं कुळे। बत्तीस वंदाचे
तेतिस कोटी देवाजींचे। आशीर्वाद

म्हणून मग मी माझ्या या भावनेला जोरानं चिमटली. वहिनीसारखी हंसलें. आणि बारशाला थाटामाटानं येईन म्हणालें. वहिनीला बरं वाटलं. मग ती मला बोलली, "तुम्ही पण सासरीं गेलांत की भावाची वाट बघाल."

तशी मी म्हणालें, "तूं कधीं ग जाणार वहिनी?"

"भाऊ येईल तेव्हां."

"मोठे दादा येणार का?"

"कोण जाणे."

"दादाला विचारूं?"

माझ्या ह्या प्रश्नानं वहिनी लाजली. पळून गेली. आणिक तिनं मला आडभिंतीच्या झरोक्यांतून सांगितलं—

चोळीची ग घडी कुंकवाची पुडी
त्यांतून माय धाडी अंतरंग
चोळी शीव रे शिंप्या मोतीं लाव शिवणीला
चोळी जाते लेकीला दूरदेशा
नणंद पुसते ग तुला भाऊ कोण कोण
चंद्र सूर्य दोघेजण बन्सबाई
माझ्या आयुष्याची भाऊराया तुला कंठी
उरल्याची तुला आंगठी बैनीबाई

तेवढ्यांत दादा आल्याचं पायतणांच्या करकरीवरून तिनं ओळखलं. ती गप्प झाली. मी हंसलें. दादाला सामोरीं गेलें. आक्कानं बाळ कसं आहे म्हणालें.

तर दादा म्हणतो कसा, "तुझ्यासारखी दिसते." मग काय! मी कमालीची हारखलें. बाळ चांगलं म्हणजे मी पण चांगली या भावनेनं उजळून गेलें. माझा आनंद गगनांत मावेना. मी दादाला चूळ भरायला गडवा भरून दिला. चहा करून आणला. दादाशीं बोलत बसलें. आणिक मग त्याला माझ्या बरच्या पाव्हणा समजून रात्रीं जेवायला वाढतांना खुशीनं पुटपुटलें—

पांची प्रकाराचं ताट द्रोण तुपाचा कुठं ठेवूं
वाणीतिणीच्या बंधु जेवूं

पांची प्रकाराचं ताट द्रोण दुधाचा निवायाला
तूप भिनवीलं शेवायाला



## महाराष्ट्र—गीत

आनंद वन भूमि ! गा वीर-वरगान ! ॥
देवी ! पुन्हां छान ! पूर्वीसमान ! ॥ ध्रु० ॥
दुर्गेपरी रूप धर कांतिमान ! ॥
चढुं देच स्फुरणास अवसान पूर्ण ! ॥ आनंद ॥
सह्याद्रिच्या शीर्षि हो गान मान ! ॥
जावो दणाणून हें हिंदुस्थान ! ॥ आनंद ॥
मर्दानि रागांत घे मर्द तान ! ॥
वीररस सिंधूस चढुं दे तुफान ! ॥ आनंद ॥
मर्दानि पदिं मांड थैमान छान ! ॥
होवो पराधीन हैराण रान ! ॥ आनंद ॥
तूं गान गाण्यास सामर्थ्यवान ! ॥
हें गान गाईल तुजवीण कोण ? ॥ आनंद ॥
हें गान गाऊन पूर्वीसमान ॥
संरक्षि सन्मान मानाभिमान ! ॥ आनंद ॥
निर्मून जनिं वीररस पुण्यवान ! ॥
घाली यशोमान जनतेस स्वान ! ॥ आनंद ॥
गा गान हें छान ! हें सुखनिधान ! ॥
दे लोक देवीस स्वातंत्र्यदान ! ॥ आनंद ॥
गा गान हें छान ! हे कीर्तिमान ! ॥
कर राष्ट्र-लक्ष्मीस ऐश्वर्यवान ! ॥ आनंद ॥
कल्याण गुणधाम गाऊन गान !
हे वीर धीरांब ! दे एक दान ! ॥ आनंद ॥
दे दान तें जाण त्रैलोक्य त्राण ! ॥
देवाधिदेवास जें स्वाधिष्ठान ! ॥ आनंद ॥
शुभ दान ! प्रिय दान ! तें तेंच दान ! ॥
दे देवि ! बलदान ! दे शौर्यदान ! ॥ आनंद ॥
गा गान राष्ट्रास कर चिर महान ! ॥
तुज रामदासाचि शिवबाची आण ! ॥ आनंद ॥

— गोविंद कवि

पांची प्रकाराचं ताट — निरशा दुधांत सोनकेळ
तोंडीं लावाया रामफळ
पांची प्रकाराचं ताट — दुधातूपानं भरली वाटी
बंधु जेवला जगजेठी
बंधुजी पावना ग — आला साकरआईचा
ल्योक लाडका आईचा

तितक्यांत अंगणांत खेळणाऱ्या शेजारच्या पोरींचं हंसणं खिदळणं ऐकूं आलं. म्हणून दाराशीं जाऊन बघतेंय तर पोरी धिंगाणा घालीत म्हणतेल्या—

सासरच्या वाटें कुचकुचु कांटे
कोण पावणा आला ग बाई...हूं...हूं...
सासरा पावणा आलाग बाई...हूं...हूं...
सासऱ्यानं काय आणलं ग बाई...हूं...हूं...
सासऱ्यानं पाटल्या आणल्या ग बाई...हूं...हूं...
पाटल्या मी लेत नाहीं, संगं मी येत नाहीं
चारी दरवाजे लावा ग बाई...हूं...हूं...
झिपरं कुत्रं सोडा ग बाई...हूं...हूं...

आणिक साऱ्या गोतावळ्याची अशीच वाट लावून अखेर शेवटीं नवऱ्याचं मात्र ऐकतेल्या कीं—

पति पावणा आल ग बाई...हूं...हूं
पतीनं काय आणलं ग बाई...हूं...हूं...
पतीनं चाबुक आणला ग बाई...हूं...हूं...
चाबुक मी घेतें, संगं मी येतें
चारी दरवाजे उघडा ग बाई...हूं...हूं...
झिपरं कुत्रं आवरा ग बाई...हूं...हूं...

आमच्या दादानं हें ऐकलं मात्र न् मला घरांत बोलवीत म्हटलं कसं, " लेकीचं नांव काय ठेवणार ? "

तशी मी बोलून गेलें, " चंद्रकला. आईनं ठरवलंय. "

" आणिक तूं ? "

" मी ? "

" हं ! "

" मी...मीं पण तेंच. "

" लेक आवडली का न्हाई ? "

" एकदम आवडली. "

" मग साखर वाटून ये गांवाला जा. "

" आत्तां ? "

" सकाळीं उठून. "

दादानं मला ही कामगिरी दिली आणि तो पान खात बसला. मी पण जेवून माझ्या जागेवर जेन टाकून निजलें..."

पण रात्रभर माझ्या डोळ्यांत तेंच. लेकीचं कौतुक. आणिक डोळे बघतेले...तोंड बोलतेलं...भावना हंसतेली...मन फुलतेलं—

शिंपांचा मळा बाई — स्वातीनं शिंपला
मोतीं मोतीं टिपुन — बाळे छताला गुंफीला
सागर सांडूनी — माणीक धुंडूनी
चंद्रसूर्य जडवीले — इवल्याशा गगनां...

●●●







अनुक्रमणिका

एक दिवस दादरमधल्या हिंदुकॉलनीतील एका ब्लॉकमध्यें एक बाई मरण पावली. तिला जिवंत करण्यासाठीं नवनाथांपैकीं संत गोरखनाथ स्वतःच आले—

# झोंपी गेलेला जागा केला

बाळ सामंत



[ मुंबई शहरांतील मध्यमवर्गीय वस्तींतील सुखवस्तु कुटुंबाचा तळमजल्याचा ब्लॉक. घरासमोरच रस्ता आहे त्याची वर्दळ पडद्याआडून ऐकूं येत असते. प्रेक्षकांच्या डाव्या बाजूच्या विंगकडे रस्त्याच्या बाजूचा दरवाजा आहे. या दरवाजाच्या वर एक चित्र टांगलें आहे. या दरवाज्याच्या समोर प्रेक्षकांच्या उजव्या बाजूला एक दरवाजा आहे. आंत बहुधा झोंपण्याची खोली आहे. खोलींत एक मळकट केनचा सोफा सेट, या सोफासेटच्या मागें प्रेक्षकांच्या समोर एक बुककेस त्यावर छोटा मर्फी रेडियो व बुककेसच्या दोन्ही बाजूला दोन खुर्च्या. पडदा वर जातो भागी, ही साधारण चाळीशीच्या पुढची केस किंचित पिकलेले, पण नीटनेटकी—आणि मध्यवर्गीय घरांत बरींच वर्षे काढल्यामुळें शुद्ध मराठी—पण कृत्रिम बोलणारी ती प्रवेश करते तेव्हां डोळे पुसत पुसतच बाहेर येते. रडून रडून तिचे डोळे सुजलेत आणि त्यामुळं नाकहि चोंदलंय. ती बाहेर येते तेव्हां तिला हुंदका आवरेनासा होतो—इतक्यांत दरवाजावर मोठ्यानें थाप—आणि—" माई भिक्षा वाढा—जय आलख निरंजन ' अशी नाथपंथी गोसाव्याची आरोळी ऐकूं येते. त्या मागोमाग त्या गोसाव्याचा चिमटा आणि कंबरेला बांधलेले घुंगरू खळखळतात. ]

**भागी** : ( काळजीपूर्वक दरवाजा उघडत ) आज मेल्या भिकाऱ्यांनीं तर भंडावलंय अगदीं !

**गोरखनाथ** : माई मला आंत येऊं दे.

**भागी** : ( तशीच दरवाज्यावर उभी राहून ) काय पाहिजे बाबा तुला ? तूं बाहेरच उभा रहा. हवीतर भिक्षा वाढते.

**गोरखनाथ** : जय अलख निरंजन ! माई मला भिक्षा नको—मला आंत येऊं दे.

**भागी** : ( आश्चर्यानें ) आंत—? आणि कशासाठीं ?

**गोरखनाथ** : कमलाताईला जिवंत करण्यासाठीं.

**भागी** : कमूताईला जिवंत करायला ? काय वेड तर लागलं नाहीं ना तुला ? चल नीघ इथून. तूं आहेस तरी कोण ?

**गोरखनाथ** : जय अलख निरंजन—मी आहे गोरखनाथ—सद्गुरु मच्छिंद्रनाथांचा शिष्य.

**भागी** : काय ? तूं संत गोरखनाथ

**गोरखनाथ** : माई—सद्गुरु मच्छिन्द्रनाथांचे शिष्य असत्य कधीं बोलत नसतात.

**भागी** : पांडुरंगा—विठुराया—आम्हा अभाग्याच्या घरीं ही काम-






घेनू आली–तुम्ही खरंच संतश्रेष्ठ गोरखनाथ ? मी स्वप्नांत नर नाहीं ना ?–छे छे–माझा माझ्या डोळ्यावर विश्वासच नाहीं बसत. मला मेलीला असलं भाग्य कुठलं लाभायला–

**गोरखनाथ :** बेटा शांत रहो मीच गोरखनाथ !–

**भागी :** ( सरळ साष्टांग नमस्कार करते ) महाराज मला क्षमा करा—पहिल्यांदा मी आपणाला ओळखलं नाहीं याबद्दल !

**गोरखनाथ :** आलख निरंजन. बेटा–अगोदर दार बंद कर ( समोरच्या दरवाजाकडे बोट दाखवीत ) तिला त्याच खोलींत ठेवलंय नाहीं का !

**भागी** –( डोळे पुसत हुंदके देत ) हो–तिथंच ठेवलंय कमला ताईला. फार कष्ट काढले बिचारीनं. चाळीसीसुद्धां उलटली नव्हती कधीं कुणाच्या अध्यांत नाहीं कीं मध्यांत नाहीं...एवढी गडगंज इस्टेट आहे पण करायची काय आतां ? कोण आतां त्याचा वाली ?

**गोरखनाथ**—सच है बेटा.

**भागी :** ( रडत ) आतां हा सारा पैसा पुतण्यांना आणि त्यांच्या पोरांना जाणार–मी तीस वर्षे यांच्या घरांत नोकरी केली–ताई मला-सुद्धां विसरल्या नाहींत. मलाहि दोन हजार रुपये दिलेत केवढी प्रेमळ मालकीण ( पुन्हां हुंदके देते. )

**गोरखनाथ :** रोना मत बेटा —

**भागी**—( हुंदके देत ) कधीं मला टाकून बोलली नाहीं कीं कधीं मला मोलकरणीसारखं वागवलं नाहीं लुगडं चोळीला–कश्शा कश्शाला नाहीं म्हटलं नाहीं कधीं–महिन्यांतून एकदां शिरडीला बाबांच्या दर्शनाला गेली तर मला नेल्याशिवाय राहिली नाहीं. आज गेली असं कळल्याबरोबर सकाळपासून माणसांची ही रीघ लागलीय आज दुपारीं नेतील तिला.

**गोरखनाथ :** जय आलख निरंजन–मला आंत जाऊं दे. तिच्या प्रेताकडे.

**भागी :** आंतल्या खोलींत–प्रेत पडलंय तिथं–न् आतां ?

**गोरखनाथ :** आत्तांच—

**भागी :** आतां नको महाराज–सारीजणं असलींत आंतल्या खोलींत रडत ( आंतून हुंदक्यांचे अस्पष्ट आवाज येतात )

**गोरखनाथ :** मला आंत गेलंच पाहिजे–तिला जिवंत करण्याची हीच वेळ.

**भागी** —खरंच महाराज, तुम्ही ताईला–जिवंत करणार ?

**गोरखनाथ** —होय.

**भागी :** पण सकाळीं आठ वाजतांच कारभार आटोपला–सहा तास झाले —

**गोरखनाथ :** सहा तास काय आणि सहा दिवस काय–मी तिला जिवंत करणार.

**भागी :** ( आश्चर्यानें ) जिवंत–अगदीं परत हाडामासांची पहि-ल्यांदा होती तशीच कमलाताई ?

**गोरखनाथ :** होय.

**भागी :** म्हणजे या पुतण्यांना एक दिडकीहि मिळणार नाहीं म्हणायची ?

**गोरखनाथ :** तुझे दोन हजार रुपयेहि जातील.

**भागी :** दोन हजार रुपये—

**गोरखनाथ :** तुझे दोन हजार रुपये तुला हवे असतील तर बाईला मी जिवंत नाहीं करीत.

**भागी :** जळा मेला तो पैसा–पैसा घेऊन काय करायचंय–महा-राज ही भागी अशी खाल्ल्या अन्नाला निमकहराम होणारी नाहीं. करा करा तुम्ही ताईला जिवंत.

**गोरखनाथ :** बाई–शाब्बास–चल, ने मला आंत–मला लवकर गेलं पाहिजे.

**भागी :** एवढी घाई कसली महाराज आपल्याला ?

**गोरखनाथ :** आणखी कांहीं चमत्कार करायचे आहेत.

**भागी :** मी नाहीं बाई आंत जायची–आंत नानासाहेब–काका चिंतामणराव–ते डॉक्टर, सगळेजण मला ओरडतील–आणि तुम्हाला हांकलून देतील–तुमचा असा अवतार...

**गोरखनाथ :** संताचा अवतार असाच असतो. ( आंत खुर्च्या सरकावल्याचा आणि माणसं उठत असल्याचे आवाज–त्यांच्या गप्पा आणि शोकप्रदर्शन संपलं असावं )

**भागी :** अगबाई नानासाहेब–वगैरे बाहेरच येताहेत वाटतं. महाराज माझ्यावर एक कृपा कराल–तीं माणसं बाहेर यायच्या आंत ?

**गोरखनाथ :** बोल घबराओ मत ! काय करूं मी तुझ्यासाठीं ?

**भागी :** आपला आशीर्वाद द्या या भागीला–आतां 'या भागीचे



अनुक्रमणिका

फार दिवस राहिले नाहींत.

**गोरखनाथ :** जय आलख निरंजन. जय सद्गुरु मच्छिंद्रनाथ बेटा माझा तुला आशीर्वाद आहे. (विभूति फुंकतो. भागी त्याला नमस्कार करते)–जा आंत जाऊन त्या मंडळींना सांग मी आलोंय.

[ भागी मुकाट्यानें आंत जाते. आणि क्षणार्धातच समोरच्या दरवाजांतून नानासाहेब आणि त्यांच्या मागोमाग भागी प्रवेश करते ]

**नानासाहेब :** (रागांत—आरडा ओरडा करीत) हा काय प्रकार आहे? काय रे भिकारड्या—काय पाहिजे तुला? कोण आहेस तूं?

**गोरखनाथ :** (चिमटा वाजवीत) सद्गुरु मच्छिंद्रनाथांचा शिष्य गोरखनाथ!

**नानासाहेब :** गोरखनाथ—सिनेमांतला!

**गोरखनाथ :** जय आलखनिरंजन!

**नानासाहेब :** ही काय भानगड आहे?—तूं काय हातभट्टीची पिऊन विऊन आलास कीं काय. बोल–कशाला आला आहेस तूं इथं. आणि हवंय काय तुला? भागे त्याला मूठभर रेशनमधले तांदूळ टाक–

**गोरखनाथ :** मला तांदूळ नको. मला तुमच्या काकीला जिवंत करायचं आहे.

**नानासाहेब :** (आश्चर्यानें) काय–जिवंत–काकीला? (भागीकडे वळून) नक्कीच यानें चिक्कार झोंकलीय कुठं तरी! सरकारनं दारुबंदी केली खरी पण वरोघरच्या भट्ट्या कांहीं थांबल्या नाहींत.–हें बघ–आम्हाला असला खुळेपणा करायला वेळ नाहीं. आमच्या काकीला आत्तांच पोचवलं पाहिजे–फारच वेळ झाला–तूं उद्यां ये–हे घे दोन आणे आणि पळ आतां—!

**गोरखनाथ :** (त्याच मखखरणें) मला तुमच्या काकीला जिवंत केलंच पाहिजे.

**नानासाहेब :** ठीक आहे–ठीक आहे. तें आपण करूं उद्यां—भागी त्याला रस्ता दाखव.

**गोरखनाथ :** तिला जिवंत केल्याशिवाय मी हालणार नाहीं.

**नानासाहेब :** (रागानें) पुरे झाला फाजीलपणा. तूं आतां इथून निघतोस कीं नाहीं? सगळीं माणसं खोळंबलीं आहेत आंत!

**गोरखनाथ :** प्रेत उठवल्याशिवाय मी हलणारच नाहीं—आलख निरंजन!

**नानासाहेब :** असं असं—बघतोंच आतां कसा जात नाहींस तें! पांडू–अरे पांडू—जरा बाहेर ये.

**पांडू :** (बाहेर येत) काय साहेब? (त्याच्या हातांत कोबीचा कांदा आणि सुरी.)

**नानासाहेब :** तो कोबी भागीजवळ दे–आणि या गोसावड्याला लाथ मारून हांकून दे. ऐकूं येतंय का—जल्दी!

**पांडू :** तें आतां करतों. (बाह्या सरसावीत) अहो मिस्टर—मच्छींदरनाथ जालंदरनाथ, कान फुटलेत कां?—निघा भायेर—नायतर—भागे, दरवाजा उघड.











**नानासाहेब :** मी उघडतो दरवाजा. ( दरवाजा उघडतात )

**पांडू :** छान--आतां याला गचांडी मारूनच हांकलून देतों. (बाह्या सरसावून गोरखनाथाची मानगूट धरतो आणि त्याला ढकलण्याचा प्रयत्न करतो. पण गोरखनाथ एखाद्या वटवृक्षासारखा अचल आहे. पांडू घामाघूम होतो--पण गोरखनाथ एक रेसभर हलत नाहीं.) अरेच्या--इचीभन्.

**नानासाहेब :** काय झालं !

**पांडू :** हलतच नाहीं जागचा लेकाचा. खांबासारखा चिकटलाय जमिनीला.

**नानासाहेब :** मी येतों तुझ्या मदतीला--( नानासाहेब आणि पांडू दोघेजण गोरखनाथाला ढकलण्याचा निष्फळ प्रयत्न करतात. पण तो तसाच अचल राहतो. )...बापरे...( घामाघूम होत ) हा भयंकर माणूस आहे. याला भीमाची ताकद दिसते. याच्याशीं जरा समजुतीनं घेतलं पाहिजे. हें पहा सद्‌गृहस्था, उगाच मारामारी करायला कशाला लावतोस ? आजचा दिवस किती दुःखाचा आहे आमच्या दृष्टीनें--आमची काकी--

**गोरखनाथ :** तिलाच जिवंत करायचं आहे मला.

**नानासाहेब :** नसता विनोद करायची का ही वेळ आहे? सगळेजण थांबले आहेत. कुणाच्या पोटांत अन्नाचा कण नाहीं. दोन वाजलेत आणि हें आम्ही आटपणार केव्हां ?

[ इतक्यांत काकासाहेब बाहेर येतात--त्यांनीं डोक्याला टॉवेल गुंडाळलाय. ]

**काकासाहेब :** नाना-कशासाठीं आतां खोळंबला आहेस ? सगळी तयारी झाली ना ?

**नानासाहेब :** तयारी कसली- हा गोसावडा जायलाच तयार नाहीं.

**काकासाहेब :** चिक्कार भांग प्यायला असेल. हे गोसावडे म्हणजे लेकाचे एक नंबरचे भांगट.

**नानासाहेब :** असंच मलाहि वाटतं.

**काकासाहेब :** मग थांबलांत का, द्या ह्याला गचांडी.

**नानासाहेब :** पण तो हलायलाच तयार नाहीं.

**काकासाहेब :** जात नाहीं म्हणतोस ?

**नानासाहेब :** आम्ही खूप प्रयत्न केला आणि थकलों. तूं बघ तुला जमतं कां ?

**काकासाहेब :** असल्या गोसावड्यांशी कोण झोंबाझोंबी करील-पांडूला सांग.

**नानासाहेब :** आमचे उपाय हरले-आणि अशा प्रसंगीं मारामारी का करायची ?

( हें बोलणं चालू असतांना आंत बसलेले पाहुणे एकामागून एक प्रवेश करतात )

**एक पाहुणा :** काय नानासाहेब-कसली गडबड आहे.

**दुसरा :** हा कोण भिकारडा ?

**तिसरा :** या भिकाऱ्याला पाहिजे तरी काय ?

**चौथा :** ही स्वारी कुठून उपटली ?

**नानासाहेब :** तों जायलाच तयार नाहीं. आमच्या भागीचाच गाढवपणा-त्याला अगोदर आंतच घ्यायला नको होतं-भिकारी एखादा दिसला रे दिसला की ती पाघळलीच म्हणे भिकाऱ्याच्या रूपानें पांडुरंगच यायचा आपल्या दाराशीं ! तिनंच या भिकारड्याला आंत घेतलं आणि तो आंतां ताईला जिवंत करण्याची. भाषा बोलूं लागलाय.

**एक पाहुणा :** असं असेल तर पोलिसाला तरी बोलावणं पाठवा.

**नानासाहेब :** पोलिसांना बोलावून आणखी तमाशा नको. अशा प्रसंगीं पोलिसांची गडबड नको.

**काकासाहेब :** पण ही पीडा कशी घालवायची ?

**नानासाहेब :** लेकाचा आपल्या बापाचंच घर समजतोय.

**काकासाहेब :** ( उपरोधिकपणें ) महाराज, आपण या खुर्चीवर बसाल कांय ? सारखे उभे कां ?

**गोरखनाथ :** ठीक आहे, मला खुर्चीची मुळींच गरज नाहीं.

**काकासाहेब :** मी जरा प्रयत्न करून बघतों ही ब्याद जाते का ? ( गोरखनाथाकडे जात ) बरं, पण आपण कोण, कुठले हें तरी सांगाल कीं नाहीं ?

## वाचकांचा कौल

दीपावलीच्या पहिल्या अंकापासून आम्ही वाचकांना एक विनंति केली होती कीं त्यांनीं दीपावलींत प्रसिद्ध होणारें साहित्य काळजीपूर्वक वाचावें आणि वर्षअखेर या साहित्यांतील आपल्याला जें सर्वोत्कृष्ट वाटेल तें कृपया आम्हांस कळवावें. याकरितां गेले दोन महिने आम्ही दीपावलींत 'कुपने' प्रसिद्ध केली व तीं भरून पाठविण्याबाबत वाचकांना विनंति केली.

दीपावलीच्या वाचकांनीं या विनंतीला साथ देऊन आमच्यावर अक्षरशः शेकडों पत्रांचा पाऊस पाडला. सुमारें ८५० वाचकांनीं आपलीं मतें कळविलीं. कांहीं पत्रांत नमूद केलेली निवड आश्चर्यकारक आणि धक्का देणारी होती. या सर्व पत्रांची पहाणी केल्यावर मराठी वाचकांची आवडनिवड कोणत्या दिशेला जात आहे याची प्रचिती आम्हास आली. वाचकांनीं बहुमतानें खालील साहित्यास मानाचें पान बहाल केलें आहे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कथा : | तपस्वी | पु. भा. भावे | वाचक | २८५ |
| लेख : | अंतु बरवा | पु. ल. देशपांडे | ,, | ४१७ |
| कविता : | ध्रुवपद | कुसुमाग्रज | ,, | १९० |
| इतर : | पाचूची बेटें | अनंत काणेकर | ,, | २५७ |

वरील साहित्याची यादी अचूक देणारे अवघे चार चोखंदळ वाचक पुढीलप्रमाणें—

( १ ) **श्री. भालचन्द्र पाठक**, मुंबई ४

( २ ) **दत्तात्रय सोमण**, वसई.

( ३ ) **चन्द्रकांत के. ठाकूर**, रतलाम.

( ४ ) **आशा कुळकर्णी**, पुणें.

यशस्वी लेखकांचे आणि वाचकांचें मनःपूर्वक अभिनंदन. लेखकांना यथावकाश पारितोषिकें पाठविलीं जातील. वाचकांना एक वर्ष विनामुल्य दीपावली मासिक पाठविण्यांत येईल.

**गोरखनाथ** : जय आलख निरंजन-मी, गोरखनाथ, सद्गुरु मच्छिंद्रनाथांचा शिष्य.

**काकासाहेब** : शक्य आहे, तुम्ही गोरखनाथच आहांत याबद्दल वादच नाहीं. ( इतक्यांत पाहुण्यापैकीं एक वात्रट तरुण चंदू गोरख: नाथाकडे पाहून डोळे मिचकावतो. त्याला पाहून )-महाराज, हा आमचा चंदू आपल्याला चांगलाच ओळखतो. ( चंदूला खालच्या आवाजांत ) चंदू, काय वाटेल तें कर पण ही पीडा घालवून टाक.

**चंदू** : ( नाटकी अविर्भावांत ) जय आलख निरंजन ! जय सद्गुरु गोरखनाथ. महाराज आपण असं अवचित येणं कां केलंत ? या गरीब भक्तांच्या करीं कोणत्या कारणास्तव पायधूळ झाडलीत ? महाराजांची काय बरं इच्छा आहे ?

**गोरखनाथ** : मला कमलाताईला जिवंत करायचं आहे.

**चंदू** : गरीब बिचारी साध्वी कमलाताई अर्थात् जिवंत करणं म्हणजे आपल्यासारख्या संतांच्या हातचा मळच आहे. ताईला तर नाथपंथीय साधूंबद्दल विशेष भक्ति होती. चातुर्मासांत नवनाथभक्तिसाराचं पारायण कधीं चुकलं नाहीं. चला मी तिच्याकडे तुम्हाला घेऊन जातों. ( चंदू रस्त्याच्या कडेचा दरवाजा उघडतो आणि गोरखनाथास उद्देशून ) महाराज या बाजूनं चलायचं.

**गोरखनाथ** : ( आंतल्या खोलीच्या दरवाजाकडे निर्देशून ) या बाजूला नव्हे. ती आंतल्या खोलींत आहे.

**चंदू** : महाराजांनीं अतिक्रमणाबद्दल क्षमा करावी. पण आजच सकाळीं प्रेत समोरच्या घरांत हलवण्यांत आलं आणि तें घरहि कमलाताईचंच आहे.

**गोरखनाथ** : ( आंतल्या खोलीकडे बोट दाखवित ) नाहीं तें आंतल्या खोलींतच आहे.

**काकासाहेब** : लेकाचा जाम ऐकत नाहीं.

**एक पाहुणा** : आपण दरवाजा उघडून याला सर्वांनीं मिळून बाहेर ढकलला तर ?

**नानासाहेब** : भलता तमाशा नको अशा वेळीं. शिवाय लेकाचा भारी चेंगट आहे. रेड्यासारखं बळ आहे त्याच्या अंगांत. मघांशी मला आणि पांडूला दाद दिली नाहीं त्यानं.

**काकासाहेब** : पण आंतल्या खोलींत प्रेत आहे हें सांगितलं कुणी याला ?

**नानासाहेब** : हा भागीचा उपद्व्याप. दुसरं काय ?

**भागी** : माझा कांहींच अपराध नाहीं बरं का साहेब. मी आपलं हो ला हो आणि नाहीं ला नाहीं केलं. विचारा तुम्ही त्यांना !

**गोरखनाथ** : या बाईनं मला कांहींच सांगितलं नाहीं.

**भागी** : आतां तुम्हीच पहा. ते प्रत्यक्ष संत गोरखनाथच आहेत. त्यांना का आम्ही सांगायचं ? आमच्या साईबाबांसारखं त्यांना पुढचं मागचं सारं कळतं. ( नमस्कार करते )

**काकासाहेब** : ( गोरखनाथाच्या पाठीवर थाप मारीत ) चला मंडळी आपण जाऊं इथून.

**पाहुणा** : तो हलण्याचं लक्षण नाहीं.

**काकासाहेब** : माझ्या डोक्यांत एक छान आयडिया आलीय.

**नानासाहेब** : काय बुवा ?

**काकासाहेब** : आपले डॉक्टर कुठं आहेत ?

**नानासाहेब** : आंत आहेत—बोलवूं त्यांना ?

**काकासाहेब** : त्यांना बोलावलंच पाहिजे. हा गृहस्थ नक्की मॅड आहे. डॉक्टरलाच त्याची केस तपासायला सांगितली पाहिजे.

**डॉक्टर** : ( सिगारेट ओढीत येतात ) काय भानगड आहे बुवा ? हा मॅड आहे कीं काय ? कीं प्यालाय ? ( गोरखनाथाला न्याहाळित ) मला वाटतं भिकारी आहे. बॉबेंत बेगर्स ॲक्टखालीं धिस फेलो कॅन बी ॲरेस्टेड—ठीक आहे. काय म्हणणं आहे स्वारीचं ?

**गोरखनाथ** : मला कमलाताईला जिवंत करायचंय !

**डॉक्टर** : शांत हो-असा त्रागा करूं नकोस. पाहूं तुझी नाडी ! कसं काय वाटतं तुला ? ( छातीला हात लावून ) इथं दुखल्यासारखं वाटतं ?

**गोरखनाथ** : ( हात झटकून टाकीत ) नाहीं—नाहीं !

**डॉक्टर** : ( कपाळाला हात लावीत ) इथं दाबल्यावर दुखतं ?

**गोरखनाथ** : नाहीं—नाहीं !

**डॉक्टर** : बरं तुला कधीं लम्बॅगोचा त्रास झाला होता का ?

**गोरखनाथ** : नाहीं-नाहीं—नाहीं ! ! !

**डॉक्टर** : बरं लहानपणीं कधीं पलंगावरून पडणं वगैरे—नाहीं कधीं व्यायम करतांना उंच उंच उड्या मारतांना—तरुणपणीं भान नाहीं राहात-पडतो माणूस केव्हांतरी. बरं-अपचन बद्धकोष्ठ-शौचाला कसं होतं आजकाल ? जीभ पाहू तुमची ?—छान छान ! बरं-श्वास घे पाहू आंत-आणखी आंत-जरा जोरानें-व्हेरी गुड ! बरं पण इथं काय काम आहे तुझं ?

**गोरखनाथ** : मला आंत जायचंय !

**डॉक्टर** : कशासाठीं ?

**गोरखनाथ** : कमलाताईला जिवंत करण्यासाठीं.

**डॉक्टर** : पण ती तिथं नाहीं.

**गोरखनाथ** : ती आंतच आहे. मला दिसतेय !








**काकासाहेब :** डॉक्टर याला एक इंजेक्शन देऊन टाका.

**डॉक्टर :** इंजेक्शन कशासाठीं ?

**काकासाहेब :** झोंपेचं. म्हणजे झोंपला कीं, त्याची गठडी वळवून त्याला रस्त्यावर सोडायचा.

**डॉक्टर :** तसं कांहीं करूंया नको. तो भयंकर माणूस दिसतोय— तुम्हीं माझं ऐकतां—

**काकासाहेब :** जरूर.

**डॉक्टर :** या वेड्या माणसाच्या कलानेंच घेणं शहाणपणाचं आहे. बरं अजून प्रेतयात्रा निघायला अर्धा तास आहे. त्याला क्षणभर आंत घेऊन जाऊ या.

**काकासाहेब :** शक्य नाहीं ते. विसाव्या शतकांत असल्या बुवाबाजीवर माझा तरी विश्वास नाहीं.

**डॉक्टर :** ठीक आहे, तुम्हाला जें योग्य वाटेल तें करा.

**नानासाहेब :** डॉक्टर म्हणतात तेंच बरोबर आहे.

**डॉक्टर :** त्यांत घाबरण्यासारखं काय आहे ! कांहीं झालं तर मी जबाबदार.

**नानासाहेब :** ठीक आहे. पण ही गोष्ट कुणाजवळ बोलायची नाहीं बरं कां ! ठीक— चला महाराज–असे आंत या.

[ आंत जातात. ]

## प्रवेश दुसरा

[ झोंपण्याची खोली. नवीन पद्धतीची लाकडी कॉट. एका बाईचं प्रेत बिछान्यावर पडलंय. तोंड झाकेपर्यंत पांघरूण आहे. कॉट प्रेक्षकांच्या समोरच. उजव्या बाजूला पाठीमागच्या बागेंत जाण्यासाठीं दरवाजा. डावीकडच्या खोलींतून सगळेजण आंत येतात. गोरखनाथाच्या मागोमाग नानासाहेब. ते त्याला प्रेत दाखवतात. ]

**नानासाहेब :** झालं तुझं समाधान. पाहिलंस आमच्या कमलताईला भागी, या तुझ्या बाबाला पाठीमागच्या दरवाजानें रस्त्यावर सोड.

**गोरखनाथ :** थांबा ! ( तो प्रेतासमोर दोन येरझारा करतो. कमंडलूंतून भस्म काढतो आणि हातांवर ठेवून त्याची फुंक मारतो ) जय आलख निरंजन. जय सद्‌गुरु मच्छिन्द्रनाथ. माई–जिवंत हो.

**बाबासाहेब :** पुरे, पुरे झाला हा तमाशा.

**गोरखनाथ :** शांत रहा. ( तो परत भस्म फुंकतो–शंख वाजवतो ) आलख निरंजन ! माई उठून बैस !

**नानासाहेब :** ( न राहावून ) बस्स, बस्स झाला हा सिनेमा. भागी, त्याला रस्ता दाखव.

**गोरखनाथ :** ( परत शंख वाजवतो ) आलख निरंजन ! उठ जाव ! ( शंख फुंकत राहतो )

[ सर्वांच्या नजरा प्रेताकडे लागल्या आहेत. प्रेत शंखांचा आवाज घुमत असतांना हलूं लागतं. आपले हात हालवतं आणि हळू हळू उठून बसतं. उठून बसतांच आपला पदर सावरतं, केंस सारखे करतं—क्षणभर स्तब्धता. त्यांत भागी एकदम आनंदानें मालकिणीजवळ जाते. ]

**भागी :** अय्याई ताई ! खरंच तुम्ही ताई— खरंच केवढा हा अद्‌भुत चमत्कार ! आलखनिरंजन महाराज गोरखनाथ, आमच्यावर दया करा—अरे असे पाहातां काय– महाराजांना नमस्कार करा !

**नानासाहेब :** भागी– उगाच वेड्यासारखं बडबडूं नकोस.

**काकासाहेब :** ताई जिवंत झालीय हें खरं.

**पाहुणा :** अशक्य आहे हें ! त्यानें कांहींतरी जादू केलीय !

**नानासाहेब :** शक्य नाहीं हें. हा भ्रम आहे नुसता.

**काकासाहेब :** पहा. तर खरं तिच्याकडे. ती कशी पाहातेय आपल्याकडे.

**नानासाहेब :** अजून तरी आपला विश्वास नाहीं बसत. कांहीं झालं तरी विसाव्या शतकांत आहोंत आपण. निसर्गाचे नियम ठरलेले आहेत. डॉक्टर तुमचं काय मत आहे ?

**डॉक्टर :** ( किंचित् गोंधळून ) काय बरं म्हणतोंय मी ! पण माझा काय संबंध याच्याशीं ? आणि या प्रांताशीं आमचा काय संबंध ? ती जिवंत आहे म्हणजे पूर्वी मृत झालीच नव्हती असाच त्याचा सरळ अर्थ होतो. उगाच चमत्कार चमत्कार म्हणून आरडाओरडा करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**नानासाहेब :** पण तुम्ही नाहीं का म्हणालांत ?—

**डॉक्टर :** काय म्हणालों मी ? मी ती मृत आहे असं कधींच सर्टिफिकेट दिलं नव्हतं. मला शंकाच होती. आणि इतकं करूनहि ती फार काळ जगणार नाहीं.

**काकासाहेब :** पण तोंपर्यंत आपल्या डोळ्यासमोर घडत असलेल्या घटनेवर विश्वास ठेवलाच पाहिजे.

**भागी :** खरंच मोठा चमत्कार ! तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवा. ते खरंच मोठे संत–खरेखुरे संत गोरखनाथ आहेत—( ताईच्या बिछा-








त्याजवळ जाऊन तिचा हात धरीत ), ताई खरंच तूं जिवंत झालीस ? पहा ती हंसतेय !

**काकासाहेब :** ताईला कांहींतरी सांगायचंय असं दिसतं !

**भागी :** आमची ताई पुण्यवान. तिला प्रत्यक्ष संत गोरखनाथांचा आशिर्वाद मिळाला.

**काकासाहेब :** ऐक जरा—

**ताई :** ( संत गोरखनाथाकडे रागानें बघत ) हा कोण गेला भिकारडा शिरलाय माझ्या खोलींत. या भिकारड्यांनीं तर सारखं मंडावलंय. भागी—भागी-कुठं गेली. तरी मी तुला सांगत होतें की दरवाजे उघडे टाकत जाऊं नका म्हणून—काय मेल्याचा अवतार, हांकून द्या त्याला. भागी—

**गोरखनाथ :** ( शांतपणें हात वर करीत ) बेटा—शांत रहो !

( ताई अक्षरहि बोलूं शकत नाहीं. तिचं तोंड तसंच उघडं राहातं आणि तीं आश्चर्यानें गोरखनाथाकडे पाहात राहाते )

**नानासाहेब :** तुम्हीं ताईचं कांहीं मानून घेऊं नका. तिला काय माहित कीं तुमच्यामुळंच—पण आम्हाला कळतंय ना ! केवढे उपकार झाले आमच्यावर ! वाटल्यास योगायोग म्हणा—चमत्कार म्हणा—कांहींही म्हणा ! निदान आपण तरी त्याचा निर्णय देऊं शकत नाहीं—
पण फार उपकार झाले आमच्यावर.

**गोरखनाथ :** जय आलख निरंजन ! मी जातों आतां, खूप कामं आहेत दुसरी.

**नानासाहेब :** छे छे—असं रिक्त हस्तानें जाऊं देणार नाहीं आम्ही आपल्याला. ताई तुम्हांला काय देईल ते-देवो पण काकासाहेबांना विचारून मला तुम्हांला कांहींतरी दिलंच पाहिजे.-बोला काय पाहिजे आपल्याला ?

**गोरखनाथ :** कांहीं नको. बेटा मला कांहीं नको. मी जातो. खूप कामं आहेत मला.

**नानासाहेब :** खूप कामं ?—पण तें कांही असो आम्ही तुम्हाला लहानशी भेट देणारच. एखादा ट्रे, फ्लॉवर पॉट, आरसा—बोला काय हवं तें !

**गोरखनाथ :** मला कांहीं नको.

**नानासाहेब :** खरंच आपल्याला कांही नको ?

**गोरखनाथ :** हां बेटा !

**नानासाहेब :** तर मग चहा तरी घ्याच, कीं कांहीं कोल्ड घेणार !

**गोरखनाथ :** मी चहा घेत नसतों.

**नानासाहेब :** मग जेवायला तरी रहा—

**तरीहि संयुक्त महाराष्ट्र झालाच !......५**



' मी कट्टर सं. महाराष्ट्रवादी आहे—
तरीहि द्विभाषिकाला माझा पाठिंबा आहे. '
—इति अशोक मेहता.

**गोरखनाथ :** शक्य नाहीं-इतर ठिकाणीं माझी वाट पाहाताहेत.

**नानासाहेब :** नाहीं तुम्ही जेवलंच पाहिजे इथं. कोण वाट पहातंय तुमची ?

**गोरखनाथ :** आणखी एक प्रेत !

**नानासाहेब :** प्रेत ! अरे बापरे—पण जिवंत माणसापेक्षां प्रेताचंच प्रेम कां ?

**काकासाहेब :** निदान चपाती भाजी तरी खा.

**नानासाहेब :** भागी-जा-चपाती घेऊन ये-( त्याच्या पाठीवर हात ठेवीत ) थोडं खाऊन जा—भागे आतां ताईकडे बघायला नको तुला !

**भागी :** पण दादा—

**नानासाहेब :** काय म्हणतोस !

**भागी :** ताईची वाचाच गेलीय ! तिचं तोंड उघडंच आहे-हात-पाय हलतात. पण शब्द उमटत नाहीं.

**नानासाहेब :** अरे बापरे ! हा काय घोटाळा ? ताई घाबरूं नकोस. जरा तोंडाची हालचाल कर. ( पण ताई हाताच्या खुणा करून सांगते, कीं मला बोलतांच येत नाहीं. )

**गोरखनाथ :** जय आलख् निरंजन ! यापुढं तिला बोलतां येणार नाहीं !

**नानासाहेब :** तिला बोलतां येणार नाहीं ? पण पांच मिनिटांपूर्वी बोलत होती आणि आतांच काय झालं ?

**गोरखनाथ :** आलख् निरंजन ! यापुढं तिला बोलतांच येणार नाहीं.

**नानासाहेब :** आपण तिची वाचा परत देऊं शकणार नाहीं काय ?

**गोरखनाथ :** शक्य नाहीं !

**नानासाहेब :** मग ती केव्हां बोलूं शकेल ?

**गोरखनाथ :** पुनरपि केव्हांहि नाहीं.

**नानासाहेब :** अगदीं मरेपर्यंत मुकी ?

**गोरखनाथ :** होय—अगदीं मरेपर्यंत मुकी !

**नानासाहेब :** कां ?

**गोरखनाथ :** तिनें पाहिलेल्या गूढ गोष्टी कुणाला सांगूं नये म्हणून.

**नानासाहेब :** कसल्या गूढ गोष्टी ?

**गोरखनाथ :** मरणोत्तर जगांतील.

**नानासाहेब :** मरणोत्तर जगांतील ! छे, छे-तूं कांहीं तरी जादूटोणा करून तिची वाचा घालविली आहेस. मोठा भयंकर माणूस आहेस तूं !

**काकासाहेब :** फारच भयंकर माणूस !

**नानासाहेब :** तुला इथं कुणी बोलावलं होतं ? बोलूं नये, पण अशा




परिस्थितींत असण्यापेक्षां ताई मेलेली परवडली. आम्ची तिच्यावर माया आहे आणि म्हणूनच तिचे हे हाल पाहावत नाहींत.

**डॉक्टर :** मी जरा बोलूं ? ( गोरखनाथाकडे जात ) गोसावड्या तुझे डोळे पाहूं दे मला !...अस्सं...तरी मला वाटलंच होतं. बरं का मंडळी ताई मेलीच नव्हती. कसले चमत्कार नी काय–ढोंगस लेकाचा ! निव्वळ योगायोग. दुसरं काय ?

**नानासाहेब :** आतां करायचं काय ?

**डॉक्टर :** पोलिसांना बोलवायचं.

**नानासाहेब :** दुसरा इलाजच नाहीं. रामू- जरा इकडे ये.

**रामू :** काय साहेब ?

**नानासाहेब :** आत्तांच्या आत्तां पोलीस चौकीवर जा आणि इन्स्पेक्टरला बोलवून आण.

**रामू :** आत्तां निघालों ( रामू जातो. )

**गोरखनाथ :** जय अलखनिरंजन. मी निघतो आतां.

**नानासाहेब :** अस्सं, म्हणजे पोलिसांचं नांव काढतांच धाबं दणाणलं. जस थांब–तुझी आतां वरातच काढतो.

[ इतक्यांत रामू एका पोलिस इन्स्पेक्टरला घेऊन येतो. त्याच्या-बरोबर एक पोलिस शिपाई आहे. ]

**इन्स्पेक्टर :** ( संत गोरखनाथाकडे बोट दाखवित ) हीच ती स्वारी काय ?

**नानासाहेब :** हीच ती स्वारी !

**इन्स्पेक्टर :** ( गोरखनाथाच्या पाठीवर हात ठेवीत ) काय महा–राज–नांव काय आपलं ?

**गोरखनाथ :** माझं नांव गोरखनाथ !

**इन्स्पेक्टर :** गोरखनाथ ? हें काय मराठी नांव नाहीं दिसत ! हें तुझं येपण नांव दिसतंय. खरं नांव काय तुझं ?

**गोरखनाथ :** हेंच माझं खरं नांव.

**इन्स्पेक्टर :** हे कपडे कुणाचे चोरलेस ?

**गोरखनाथ :** माझेच आहेत हे.

**इन्स्पेक्टर :** गांवाचं नांव ?

**गोरखनाथ :** गांव नाहीं मला.

**इन्स्पेक्टर :** बरंय ! पण आतां कोठून आलास ?

**गोरखनाथ :** स्वर्गातून !

**इन्स्पेक्टर :** कुठं आहे हा स्वर्ग ?

**गोरखनाथ :** पुण्यसंचय गांठीशीं असला कीं आत्मे जेथें जातात तो हा स्वर्ग !

**इन्स्पेक्टर :** अस्सं ! ( नानासाहेबांकडे वळून ) बरं–यानं काय केलं ? चोरी–घरफोडी ?

**नानासाहेब :** चोरीपेक्षां भयंकर कृत्य.

**इन्स्पेक्टर :** तें कसलं ?

**नानासाहेब :** मला वाटतं हा गृहस्थ शिरला तो चोरीसाठींच. आमच्या ताईच्या खोलींतच दागिने ठेवलेले असतात. याला पाहून ती ओरडली–भयानं–त्याबरोबर यानें तिची वाचाच बंद करून टाकली– आतां ही तक्रार नाहीं–काय घडल तें सांगतोंय मी !

**डॉक्टर :** मी होतों त्यावेळीं इथंच. मी देईन साक्ष वाटेल तेव्हां.

**काकासाहेब :** फौजदार साहेब—हा कोणी जादूटोण्या किंवा वेडा असावा. एकूण भयंकर माणूस.

**इन्स्पेक्टर :** जाधव–याला हातकड्या घाला. ( जाधव हात-कड्या चढवतो. )

**काकासाहेब :** छान, छान ! मग काय फौजदार साहेब, चहा घेणार ना ?

**इन्स्पेक्टर :** चहा ना ! अवश्य घेऊं.

**नानासाहेब :** अरे रामू चहा घेऊन ये.

**रामू :** साहेब, चहा तयारच आहे.

( आंतून सर्वांसाठीं चहा आणतो )

**गोरखनाथ :** मला तहान लागलीय. पाणी देतां कां ?

**इन्स्पेक्टर :** पाणी ? चांगलंच पाणी पाजतो तुला ! चल चौकींत. चल––चलो—!

[ इतक्यांत दरवाजाची बेल वाजते. रामू दरवाजा उघडतो. इन्स्पेक्टरहून वरच्या दर्जाचा अधिकारी पोलिस सुपरिंटेंडेंट येतो. त्याला पाहून सगळे चपापतात. इन्स्पेक्टर व पोलिस त्याला खाडकन् सलामी ठोकतात. ]

**सुपरिंटेंडेंट :** ठीक आहे–मोरे, तुम्हीं इथं आहांतच. अस्सं— म्हणजे हेच ते प्रख्यात संत गोरखनाथ. संतशिरोमणि संत गोरखनाथ ते हेच. मला सारं कांहीं कळतंय !

**नानासाहेब :** आपण ओळखतां यांना ?

**सुपरिंटेंडेंट :** वाः ! यांना कोण नाहीं ओळखणार ? हे तर सद्गुरु मच्छिन्द्रनाथांचे शिष्य बरं का ( डोक्याकडे बोट दाखवीत ) स्वारी जराशी ढिली आहे. हाच तो माणूस––सारं कांहीं त्याचं ठरलेलं असतं. मेलेल्यांना जिवंत करायचं––अधूनमधून जय आलख निरंजनचा घोष. मागच्या खेपेला ठाण्याच्या इस्पितळांतून पळाला तो आत्तां सांपडलाय. जरा फरक झालाय स्वारींत–पण नक्की तोच—त्याची दाढी लांब होती–यानें कापली असेल – कोर्टांत पाहूं – खरा कोण तो – चला गोरखनाथ–चला आतां !

**नानासाहेब :** त्याला मागच्या दरवाजानें न्या म्हणजे उगाच गडबड नको.

[ दरवाजा उघडतात––बाहेर जणूं सोसाट्याचं वादळ अशी एका-एकीं हवा ]

**काकासाहेब :** काय हवा बदलली पण !

[ गोरखनाथला दरवाजाकडे नेतात. ]

**भागी :** पण महाराज तुमच्या पायांत वहाणा नाहींत–छत्री नाहीं-ही घ्या माझी मोडकी छत्री–आणि या घ्या वहाणा ( आपली छत्री आणि वहाणा पुढें करते )

**गोरखनाथ :** जय अलख निरंजन–बेटा–शंकर तुझं कल्याण करील ( हंसतो–क्षणभर खोली त्यां हास्यानें उजळते )

**नाना :** भागे–भागे–काय तमाशा मांडलांस हा !

[ पान ४४ वर पहा ]








# श्रद्धा

शांता माटे

" ह्यांचं बाळ आहे हे, ह्यांचं, या नराधमाचं" आणि कार आहे हें लक्षांत येण्याच्या आंतच क्षणार्धात श्रद्धानें पांच पौंडा नाजुक गोळा डॉ. श्रीधर जोशी यांच्या पुढ्यांत आपटला.

व च पक्षांतील ती काळीभोर रात्र होती!

रिसेप्शन सेंटरमधील साऱ्या मुली अंधाराला कवटाळून बसल्या होत्या. त्यांतल्या कांहीं निश्चिंतपणें झोंपीं गेल्या होत्या तर कांहीं अजून जाग्याच होत्या. त्या काळ्याकुट्ट अंधाराच्या पडद्यावर त्यांना गतजीवनाचीं लखलखीत चित्रं दिसत होतीं... सावत्र आई, व्यसनी बाप, कर्जबाजारी काका, डोकं फिरलेला मामा—आवतींभोवतीं वखवखणारे भुकेले डोळे—तो वासनांचा हिडिस थयथयाट—!

रात्रीची दहा वाजतांची शेवटची राऊंड घेऊन मी माझ्या खोलींत येऊन नुकतीच अंथरुणावर पडलें होतें. झोंपण्यापूर्वी कांहींतरी वाचण्याचा प्रयत्न करीत होते.

पण तेवढ्यांत सेंटरच्या वॉचमनने येऊन दार खडखडावले. येणारी झोपेची गुंगी घालवून मी दार उघडलें.

मला सलाम करून वॉचमन म्हणाला, 'बाई बाहेर एक मुलगी आली आहे.'

'पोलीस वगैरे कुणी सोबत आहेत कां?' साधारणतः अशा ह्या वेळेस पोलीसाकडून केसेस आणण्यांत येत असत, म्हणून मी चौकशी केली. निराधार भटकत असणाऱ्या किंवा वाईट धंदे करण्यास चटावलेल्या अशाच बायका ह्या वेळेस येत असत.

पण वॉचमनने सांगितले, 'एकटीच आली आहे.'

'सोड तिला आंत.'

भलत्या सलत्या वेळेसचा हा त्रास नेहमींचाच असल्यानें मी तत्परतेने उठत सेंटरच्या ऑफिसबाहेरील व्हरांड्यांत आले.

ती तेथें उभी होती,—देखणी, सुंदर, तरुण मुलगी! पण अत्यंत निस्तेज दिसंत होती ती. चेहऱ्यावर काळसर पांडुरकेपणा पसरला होता. हातावरच्या व मानेवरच्यां शिरा बाहेर दिसत होत्या. गालांची व मानेखालची हाडें वर आलीं होतीं.

मी एका क्षणांत तिच्याकडे निरखून पाहून घेतलें.

जाणवेल-न जाणवेल अशाच अवस्थेंत होती ती!

मला त्याबद्दल आश्चर्य वाटलें नाहीं. सेंटरमध्यें अशा केसेस हमखास येत असत.

तिच्याजवळ जाऊ नि तिच्या खांद्यावर हात ठेवीत मी तिला विचारलं, 'आंत यायला हरकत नाहीं ना तुझी कांहीं?'

'मी रहायलाच आले आहे इथें.'

'मग जरूर रहा.'

मी तिला ऑफीसच्या आंत नेलें नि माझ्या शेजारच्या खुर्चीवर बसवत तिला विचारलं,

'आतां मला सांग सगळं,-सगळं सांग.'

आतांपर्यंत ती माझ्याकडे भेदरल्यासारखी पहात होती. पण मी हा प्रश्न विचारल्यानंतर मात्र ती बावरली. नि नंतर रडूं लागली. अत्यंत केविलवाणेपणानें.

रडत असतांनाच एकाएकीं माझे पाय तिनें पकडले आणि असहायतेनें माझ्याकडे पहात गदगदलेल्या आवाजांत ती म्हणाली.

'बाई, मला तुमच्या मदतीची फार फार गरज आहे हो. मी चुकले, फसले मी.' आणि ती जास्तच जोरांत रडूं लागली.

तिला समजवण्याच्या हेतूनें मी तिच्या पाठीवरून हात फिरवला नि तिला म्हटलें,

"असं काय करतेस वेड्यासारखं? अग माणूस म्हटलं म्हणजे चुका या व्हायच्याच—पण अजून कुठं वेळ गेलीय?"

ती भांबावून माझ्याकडे पाहूं लागली. मी काय बोलले, हें तिच्या कितपत लक्षांत आलं कुणास ठाऊक! पण तिला एवढं मात्र वाटलं, मी तिचा तिरस्कार केला नाहीं. ह्याच्यांतच केवढं समाधान होतं तिला!

आणि तरीही स्वतःचं नांव सांगतांना ती कावरी बावरी झाली. अडखळली. आणि नकळत एक हुंदका तिच्या तोंडावाटे बाहेर पडला. कु. श्रद्धा परांजपे ह्या नांवामागचं पावित्र्य नाहींसं झालं होतं. त्या नांवाला कलंक लागला होता. त्या नांवाभोंवतालची नातीं तुटलीं होतीं. जगांत ह्या नांवानें अभिमानानें जगतां येत नव्हतं.

मनावरील दुःखाचं ओझं हलकं करावंसं वाटूनहि अप्रिय गोष्टींचा उच्चार करण्यास तिचं मन धजत नव्हतं. तिला बोलकं करावयास हवं होतं. पण सरळ प्रश्न विचारून माहिती काढून घेणं पण उचित नव्हतं. तिचं मन दुखावलं असतं माझ्याबद्दल तिच्या मनांत अप्रीति निर्माण झाली असती. म्हणून मला आडवळणाचा मार्ग घ्यावा लागला—सहानुभूतीनें ओथंबलेला.

मी तिला विचारलं, 'श्रद्धा, तूं एकटीच कशी आलीस ह्या वेळेस?'

'बाई, आज तीन महिने झाले मी कुठं बाहेर पडले नाहीं. प्रकाशाचा किरण देखील बघितला नाहीं. पण वहिनींच्या आणि भावांच्या लक्षांत आलं. पुष्कळ उपचार केले. ज्यांच्यापासून गरोदर राहिले त्यांनाहि कांहींतरी उपाय करा असं विनवलं. ते एक नामांकित डॉक्टर आहेत. पण असलं पाप आपण करणार नाहीं म्हणून धुडका-वून लावले त्यांनीं मला. वर्तमानपत्रांत सेंटरबद्दल वाचलं नि सरळ धांव घेतली इकडे मी.'

त्या दिवशीं जास्त कांहीं विचारलें नाहीं मी तिला. तिचा मुख्य प्रश्न कळला होता. अप्रिय गोष्टी जर ऑफिसच्या काटेकोर नियमां-प्रमाणें जबरदस्तीनें वदवून घेतल्या असत्या तर माझ्याबद्दल तिच्या मनांत दूरत्वाची अढी निर्माण झाली असती. आणि हेंच मला टाळायचं होतं.

सेंटरच्या मुलींचे दोन गट पाडले होते. चुकून फसलेल्या आणि सुधारण्याची इच्छा असलेल्या मुलींचा एक गट होता. व स्वभावानेंच वाईट असलेल्या आणि सुधारण्यास बरेच दिवस लागतील अशा मुलींचा दुसरा गट होता. श्रद्धाला त्या रात्रीं मी पहिल्या गटांत नेऊन सोडत असतांनाच दाराशींच मला अडवून श्रद्धा मला म्हणाली, 'बाई, एक विनंति आहे तुम्हाला.'

'काय?'

'माझ्या घरच्या माणसांना माझ्या येथें येण्याविषयीं कळवूं नका. मी मेल्यें त्यांना—त्यांना कळून चुकलंय् सारं.'

श्रद्धा परत फिरली. माझ्याकडून आश्वासन मिळालं आहे असं समजून,—माझ्या विश्वासावर पुरेपूर विसंबून.

खोलींत परत येतांना माझ्या डोळ्यासमोर सेंटरमधील तऱ्हे-तऱ्हेच्या स्त्रियांचे जीवनपट सरकूं लागले...

पोटासाठीं घराबाहेर पडलेली,—खेडेगांवच्या परिसरांत कष्टांवर वाढलेली आंबरी! भाकरीच्या लालचीनें एका माणसाच्या खोलींत शिरली नि वेश्या होण्यासाठीं बाहेर पडली,—पोटासाठींच! स्वतःच्या सौन्दर्याचा उपभोग घेण्यासाठीं वखवखलेल्या तरुणांच्या नजरांना खाद्य पुरवणारी, सौन्दर्याच्या गर्वानें फुगून तरुणांना झुलवीत ठेवण्यांतच जीवनाचं ध्येय मानणारी सुवेशा! सारं शरीर सडल्यावर भानावर आली. आतां तिला त्या तरुणांचा सूड घ्यावासा वाटतो. वेडी पोर! पोरीवर पैसे मिळवण्याच्या लालचीनें नवऱ्याकडे न पाठवतां, पोरीसाठीं ज्यास्त किंमतीचं गिऱ्हाईक शोधणारा भागीचा बाप! गांवांतल्या गांवगुंडापाशीं वासनांचा मोह न आवरून भागी गेली. तिच्या पाळतीवर असलेल्या गांवगुंडानें तिच्या तारुण्याचा मनसोक्त उपभोग घेतला नि शेवटी लाथ मारून घराबाहेर घाल-वून दिलें.

अशी एक नाहीं अनेक चित्रें डोळ्यासमोर आलीं. सद्सद्विवेक बुद्धि ताणली गेली. मन थरथरलं. श्रद्धाचं तें कोवळं तारुण्य डोळ्यासमोर उभं राहिलं वासनेचा हा नवा बळी! माझं मन कसं कुंद झालं. मी गुदमरून गेलें...

पण नंतर माझं मलाच हंसूं आलं. सेंटरमधल्या साऱ्या मुलींच्या जीवनांत नवा आनंद निर्माण करण्यासाठीं हें सेविकेचं व्रत मी घेतलेलं आहे. नाहीं तर ह्या साऱ्या मुली सैरावैरा कुठं तरी भरकटणार.

अशाच या भरकटल्या स्त्रियांना ताळ्यावर आणण्यासाठीं निर्माण झालेलं हें सेंटर! ह्यांच्यांत कांहीं प्रथमावस्थेंतील आहेत आणि कांहीं शेवटच्या अवस्थेंतील आहेत. फक्त दोनच टोकं! श्रद्धासारख्या प्रथमावस्थेला आधार मिळाला नाहीं, तर शेवटचंच टोक गांठणाऱ्या ह्या साऱ्यांना मला समाजांत पुन्हां पाठवायचं आहे; नवी चेतना देऊन!

पण समाज ह्यांच्यावर प्रेम करील का? माझ्या मनांत क्षणभर गोंधळ उडाला.

श्रद्धाची सारी माहिती मी तिचा विश्वास संपादन करून, तिच्या साऱ्या चुकांची क्षमा करून, तिच्या भावनांशी समरस होऊन, तिच्याच दृष्टीनें तिच्याकडे पाहून, काढून घेतली. तिचं खरंखुरं चित्र तिनेंच रेखाटलं.

एकोणीस वीसच्या दरम्यान रेंगाळणारं, कुतुहलानें, औत्सुक्यानें जगाकडे पाहणारं, स्त्री-पुरुष संबंधाच्या स्वप्नाळू कल्पनांशी खेळणारं तिचं ते बुजरं वय होतं. घरांत साऱ्यांत धाकटी म्हणून लाडावलेली होती श्रद्धा. लहानपणापासून स्वतःच्या हट्टा-प्रमाणें वागण्याची संवय झालेली होती तिला. कारण तिचे हट्ट, वडील, आई, चार मोठे भाऊ याजकडून पुरवले जात. तिच्या वागणुकीवर कुणीहि निर्बंध घालीत नसत. शिक्षणासाठीं तीं दोन मोठ्या भावांकडे औरंगाबादला येऊन राहिली. आई वडील व दोन धाकटे भाऊ








जळगांवला रहात होते. दोन्ही भाऊ नोकरीसाठी दिवसभर बाहेर जात. मोठ्या भावाचं लग्न झालं होतं. पण तिनें वहिनीच्या अधिकाराला कधींच जुमानलं नाहीं. वागणुकींतील अनिर्बंधता वाढत गेली. वहिनीच्या आजारपणांत एका तरुण डॉक्टरशी तिची ओळख झाली. त्या तरुण डॉक्टरच्या मोटारींत लिफ्टस् घेण्यांत तिला आनंद वाटू लागला. तिच्या कॉलेजच्या येण्याजाण्याच्या रस्त्यावर त्या तरुण डॉक्टरची मोटार नेहमीं दिसूं लागली. तिला उत्तेजन मिळालं.

एके दिवशीं डॉक्टर तिला म्हणाले, 'दहा मैलावर एक खेडं आहे तिथे व्हीजीटला जायचं आहे. येणार का तूं ? चांगली सहल होईल.'

सहलीच्या कल्पनेनें ती सुखावली.

'हो येणार. पण संध्याकाळीं माझे भाऊ घरीं परत यायच्या आंत घरीं हजर व्हायला पाहिजे.

'त्याची काळजी नको.

मैत्रिणीबरोबर सहलीला जाते, असं सांगून श्रद्धा त्या तरुण डॉक्टरबरोबर गेली. मोटारच्या प्रवासांत डॉक्टरनें उत्तान चित्रें असलेल्या इंग्लिश मासिकांचे दोनचार अंक तिच्याकडे दिले. चित्रें पाहून श्रद्धाच्या भावना चाळवल्या गेल्या. मोटार नादुरुस्त झाली असं सांगून डॉक्टरनीं श्रद्धाला एका डाकबंगल्याजवळ उतरवले. सहलीला आणलेले फराळाचे पदार्थ खाऊन दुसऱ्या गाडीनें पुढें जाऊं असं सांगून त्या डाकबंगल्यांत नेऊन डॉक्टरनें तिच्या चाळवलेल्या भावना चेतवल्या व जें घडूं नये तें झालं,—श्रद्धाच्या संमतीनेंच. पण घडून गेल्यानंतर चूक झाली हें तिच्या लक्षांत आलं आणि त्याला फार उशीर झाला. निसर्गानें आपली कामगिरी बजावली.

श्रद्धाची ही माहिती मी लिहून घेतली आणि मला आश्चर्याचा धक्का बसला. श्रद्धा येण्यापूर्वी पंधरा दिवस अगोदर बाळंतपणांत नर्सेसकडून झोप येत नाहीं म्हणून झोपेच्या गोळ्या मागून अरुंधती पवारनें सेंटरमध्ये परत येण्याच्या दिवशीं गोळ्या खाऊन आत्महत्या केली होती. अरुंधती पवार आणि श्रद्धा परांजपे ह्या दोघींच्याही हिस्टरींत कमालीचें साम्य होतें. अरुंधतीला पण एका डॉक्टरकडून लिफ्टस् मिळाल्या होत्या. १० मैलांवरच्या खेड्यावर व्हिजिटसाठीं जाणाऱ्या डॉक्टरनें अरुंधतीला सहल म्हणूनच नेलें होतें. वाटेंत भावना चाळवण्यासाठीं उत्तान चित्रांची इंग्लिश मासिकें दिलीं होती. व एका डाकबंगल्याजवळ मोटार नादुरुस्त झाल्याचें सांगून फराळासाठीं बंगल्यांत नेऊन इप्सित साध्य केलें होतें.

श्रद्धाचे बाळंतपण जसजसें जवळ येऊं लागलें तसतशी अरुंधतीची ज्यास्तच आठवण होऊं लागली. सेंटरतर्फे बाळंतपणाला अरुंधतीला सरकारी दवाखान्यांत पाठवण्यांत आले होते, पण दवाखान्यांतील मेट्रननें जेव्हां दवाखान्याच्या ऑनररी सर्जनला राऊंडच्या वेळेस अरुंधतीच्या कॉटपाशीं आणून illegitimate child ची केस म्हणून ओळख करून दिली होती, तेव्हांच जीवनातील ती विसंगती पाहून—स्वतःच्या दुर्बल जीवनाची निरर्थकता ओळखून—हताशपणे वैफल्याने आणि निराशेने तिने आत्महत्या केली होती.



## शरीरस्य कथा रम्या।

# त्वचा : ३

रा. वि. सोवनी, M. Sc.

शरीरांतल्या कोणत्याहि इंद्रियापेक्षां अधिक गुंतागुंतीचे भाग त्वचेमध्यें आढळतात. तिचें कार्यच बहुविध असल्यामुळें तिच्यामध्यें एवढे घोटाळे असणे शक्य आहे. परंतु आश्चर्य असें कीं, हीं आपली अष्टवधानें ती सारख्याच कुशलतेने पार पाडते. कातडीच्या मागे दडविलेले अनंत घोटाळ्यांचें थोडेसे दर्शन घ्यावयाचें असल्यास पुढील आंकडेच वाचा. १ चौरस सेंटिमीटर त्वचेमध्यें, थंडी ग्रहण करणारे २ तंतू, उष्णतेचे १२, ३ लक्ष पेशी, १० केंस, १५ तैलग्रंथी, १ वार्ड लांबीची रक्तवाहिनी, १०० घर्मपिंड, १२ फूट मज्जातंतू, २५ स्पर्शबिंदु, वेदना ग्रहण करणाऱ्या मज्जातंतूचें २०० फांटे. एवढ्या प्रचंड गोष्टी एवढ्याशा जागेंत बसविण्यांत विधात्याचें कौशल्यच दिसून येते.

त्वचा जरी कितीहि सपाट आणि नितळ दिसत असली तरी तिच्यावर असंख्य रेषा असतात आणि त्यामुळेंच ती उंचसखल असते. त्या रेषांचे हातांच्या बोटांवरील शंख, चक्र, पद्म इत्यादि आकार आपल्याला माहित आहेतच. हे आकार व छाप प्रत्येकांत वेगळें असतात आणि त्यामुळेच प्रत्येकाच्या बोटांचे ठसे विविध प्रकारचें असतात. आतां हे असें कां ? बोटांवरील रेषांच्या रचनेचे सामान्यतः शंभर गुण केलेले आहेत. अंगठ्या जवळच्या बोटांवरील रचनेमधील दोन प्रकारच्या रेषांमध्यें साम्य असणारे दोन लोक शोधण्यासाठीं १६ लोकांची पाहणी करावी लागेल. तीन गुण जमणारे दोन लोक ६४ लोकांमध्यें सांपडतील. चार गुण जमणारे लोक २५० लोकांत सांपडतील. म्हणजे एका बोटाच्या शंभर गुणांची पत्रिका दुसऱ्याशीं जमण्यासाठीं पृथ्वीवर आतांपर्यंत होऊन गेलेल्या सर्व माणसांची जंत्री करावी लागेल. ही गोष्ट एका बोटाची पण आपल्याला तर १० बोटें आहेत. मग एकाच छापाचे हात दोन व्यक्तींमध्यें सांपडणें अशक्य धरावे लागेल. म्हणून बोटांच्या ठशांना गुन्हेगारी शास्त्रांत फार महत्त्व आले आहे. आपल्याकडे फार पूर्वीपासून अंगठा उठविण्याची पद्धत आहे. आणि ती अत्यंत चोख पद्धत आहे. कारण बोटांच्या-ठशांची नक्कल जिथे निसर्गाला जमत नाहीं तिथें मनुष्य काय करणार ? पूर्वेकडील देशांत अंगठ्याची पद्धत बरीच जुनी आहे. परंतु इतकी निर्दोष पद्धति मान्य करण्याचें पाश्चिमात्य लोकांनी कसें नाकारले ह्यांच आश्चर्य आहे.

लहान मुलांच्या पाटीवर आपण अनेक वेळा लिहितों आणि पुसून टाकतो. पाटी परत कोरीच राहाते. तसेच कातडीचें आहे. वरचे थर एकसारखे टाकलें जात असतात आणि त्यामुळे त्वचा चिरयौवनावस्थेंत असते. तिच्यावर पडलेले तेलाचे, शाईचे, असिडचें







अनुक्रमणिका

डाग आपोआप जातात कारण वरच्या थरांतील शिंगासारख्या पेशी अव्याहत टाकल्या जात असतात. भट्टीचा गंजीफ्रॉक सकाळीं घातल्यावर तो संध्याकाळपर्यंत आंतून मळलेला दिसतो. कारण अंगावरून एकसारख्या पडत असलेल्या पेशी. त्वचेची स्वच्छता राखण्यासाठीं साबणाचा वापर करण्याची पद्धत अलिकडच्या काळांतील आहे. अर्थात् आजच्या युगांतसुद्धां अजून साबण न वापरणारे "आचार्य" आढळतात ते वेगळें. पुरातन काळांत साबण नसल्यामुळें अंगाला घाम आणून त्यामार्फत त्वचा साफ करण्याची पद्धत असे त्या कालांत स्नान करणें माहितच नव्हते अंगाला घाण येऊं नये म्हणून सुगंधी फवारे व अत्तरें वापरण्याची पद्धत तेव्हांपासून पडली आहे.

मानवाच्या शरीराला झाकणाऱ्या ह्या त्वचेचं एक सौंदर्य म्हणजे केस, हा प्रथम बाहेरच्या घरांत वाढतो पण मग आपले मूळ आंतल्या बाजूला चांगलेच रोवतो. मुळांभोंवतीं केशवाहिन्यांचें जाळे असतें व एक छोटासा स्नायू असतो. मुळांतील पेशीं पासून केस वाढतो, व शरीराबाहेर डोकावतो. केसांची वाढ रात्रीं पेक्षां दिवसा जास्त असते. आणि त्यां तूनहि सकाळीं १० ते ११ व संध्याकाळीं ४ ते ६ ह्या दरम्यान ही वाढ जास्त तेज असते. दर महिन्याला केस अर्धा इंच वाढतो शरीरावरील सर्व केस एकत्र करून त्यांचा जर एक केस बनविला तर तो एका वर्षांत ३०।४० मैल वाढेल.

केसांचें आयुष्य त्यांच्या स्थानावर अवलंबून असतें उदा० पापणीचें केस दर सहा महिन्यांनी गळून पडतात. पुरुषांच्या डोक्यावरील केस तीन चार वर्षें टिकतात तर स्त्रियांमध्यें डोक्यावरील केस ७ वर्षें टिकतात. शरीरावरील केसांची वाढ बहुधा प्रवर्तकांमुळें नियंत्रित केलीं जाते.

केंस दिसायला बारीक असलें तरी "गळा कापायला" कमी पडत नाहींत. ते अत्यंत चिवट असतात. एक केंस दीड ते दोन औंस वजन सहज पेलतो. डोक्यावरील सर्व केंस एकत्रित केल्यास एक टन वजन सहज उचलूं शकतात. केसांच्या मुळाशीं स्क्रूसारखी रचना असल्यामुळें ते सहज उपटले जात नाहींत. मुळांत असलेल्या पेशींमध्ये रंगीत द्रव्य असतें व त्यामुळें केसाला रंग येतो. हे द्रव्य जितके जास्त दाट तितकें केस काळे. हा रंगीत पदार्थ विरळ होऊं लागला म्हणजे केस पांढरा होऊं लागतो. आपल्या शरीरावर ३ ते ५ लक्ष केस आहेत.

त्वचेमध्यें असणारीं घर्मपिंडें घाम तयार करतात. हा घाम शरीरावर आम्ल आवरण तयार करतो त्यामुळें सूक्ष्म जिवाणू (बॅक्टिरिया) त्यांवर राहूं शकत नाहींत. घामामुळें त्वचा थंड ठेवली जाते. घाम हा एकसारखा शरीरांतून बाहेर टाकला जात असतो. सगळ्या धर्मपिंडनलिका एकत्र केल्या तर सहा मैल लांबीची नळी तयार होईल. घर्मपिंडनलिकांचीं तोंडे एकत्र केलीं तर वाफेच्या इंजिनाचें धुरांड्याएवढें भोंक तयार होईल.

कातडी सूर्य प्रकाशाचा उपयोग करून 'ड' जीवनसत्व तयार करतें. आणि त्याचा आपल्याला फार्च उपयोग होतो. शिवाय स्पर्श, उष्ण, थंड, सपाट, ओबड, धोबड, जड व हलकेपणा इत्यादि सर्व ज्ञान देणारी ही त्वचा म्हणजे आपल्या शरीरांतील एक अजब चीजच आहे.

● ● ●

आधीच विधवा म्हणून ती हताशपणें जगत होती. आणि तिच्या आयुष्यातील त्या घृणास्पद घटनेनें तिची जगण्याची आशाच संपुष्टांत आणली होती. आणि तरीदेखील आपल्या मृत्यूने आपल्या पावित्र्याचं दान घेतलेल्या माणसाच्या मनांतील माणुसकी जागवावी असं तिला वाटलं होतं. आपल्या मृत्यूनें त्याच्या मनाला वेदना व्हाव्यात, त्या वेदना त्याला टोंचत रहाव्यात, त्याचं मन खात रहावं आणि अशा तऱ्हेने आपल्या दुःखाचा सूड उगवता यावा असं तिला वाटलं होतं. व त्यासाठीं तिनें तो अघोरी मार्ग पत्करला होता.

मरणापूर्वीं तिनें तिच्या उशीखाली एक चिठ्ठी लिहून ठेवली होती: नि त्यांत तिने तिचे हे विचार मांडले होते. तिच्या जीवनाचा शेवट घडवणाऱ्या त्या माणुसकीशून्य माणसाचं नांव तिने त्या चिठ्ठीत लिहलं होतं. प्रतिष्ठेच्या बुरख्याखालीं लपवलेले एक हाडामांसाचे कुजके प्रेत लोकांच्या नजरेस आले असतें, जर ती चिठ्ठी पोलिसांच्या ताब्यांत गेली असती तर! पण वार्डच्या मेट्रननें अरुंधतीच्या तान्ह्या मुलासकट ती चिठ्ठी माझ्याकडे आणून दिली. सेंटरच्या मॅनेजिंग कमिटीची मिटींग बोलावून कमिटीच्या चेअरमनला मी ती चिठ्ठी दाखविली. कमिटीच्या प्रतिष्ठित चेअरमननें आपल्या प्रतिष्ठेला साजेशा असलेल्या डॉक्टरला वाचवलं. चिठ्ठी आपल्या ताब्यांत घेऊन सारं प्रकरण दाबून टाकलं.

[ पान ४६ वर चालू ]

---

[ पान ४० वरून चालू ]

**भागी :** मीं येतेंच तुमच्याबरोबर महाराज-( भागी बाहेर जाते )

**नाना :** मूर्ख कुठली-तिला वाटलं खरंच संत गोरखनाथ आलेत.

( दरवाजा बंद होतो-आणि खोली किंचित अंधारते. उदासीन होतें )

**नानासाहेब :** चला सुटलों एका लफड्यांतून !

**काकासाहेब** काय भयंकर माणूस होता ?

**नानासाहेब :** ( ताईच्या बिछान्याकडे जात ) बरं मग ताई तुझं कसं काय ?

**काका :** ताई असं काय करतेस-पाहा पाहा ती बेशुद्ध झाली डॉक्टर

**डॉक्टर :** थांबा भिऊं नका ! ( तपासतो ) याक्षणीं ती खरंच मरण पावलीय.

**नानासाहेब :** शक्य नाहीं हें !

**डॉक्टर :** पण ती वस्तुस्थिति आहे.

**काकासाहेब :** डॉक्टर-आणखी एकदां पहाना नीट.

**डॉक्टर :** पाहायलाच नको. खेळ संपलाय !

**नानासाहेब :** ताई-ताई !—( हुंदके देतो )

( क्षणभर मृतवत शांतता. सगळेजण बिछान्याकडे जमतात )

**काकासाहेब :** काय भयंकर दिवस हा ?

( बाहेर जणूं सोसाट्याचं वादळ—असे आवाज )

**नानासाहेब :** आणि हवा अशी कशी बदलली एकदम ? असं वादळ कसं काय झालं ?

**काकासाहेब :** पण कांहीं म्हणा-त्या भिकाऱ्याशीं आपण उगाच कठोरपणें वागलों-आणि खरोखर विचार केला तर त्यानं आमचं असं काय घोडं मारलं होतं ! !

( कल्पना परकीय )










अनुक्रमणिका

( पान ४४ वरून चालू )

हें सारं माहित असूनहि सेंटरच्या मॅनेजिंग कमिटीला मी श्रद्धाचं बाळंतपण खाजगी दवाखान्यांत करण्याची सोय व्हावी म्हणून सुचवलं होतं. सरकारी दवाखान्यांतील ऑनररी सर्जन डॉ. श्रीधर जोशी आणि अरुंधती व श्रद्धाला विघडवणारे डॉ. श्रीधर जोशी एकच, हें पण मी कमिटीला सांगितलं; पण प्रतिष्ठीतपणें दिमाखानें समाजांत मिरवणारा डॉ. श्रीधर जोशी हा, तो नव्हे!—असें कमिटींतीस प्रतिष्ठित (?) सभासदांनी आणि चेअरमन साहेबांनीं टेबलावर मूठ ठोकून सांगितलें. मीच चौकशी बरोबर केली नाहीं असा आरोप एकमतानें सर्वांकडून करण्यांत आला आणि श्रद्धाला सरकारी दवाखान्यांत पाठवण्यांत आलं.

ज्या दिवशीं दवाखान्यांत श्रद्धाला पाठवण्यांत आलं,—त्याच दिवशीं रात्रीं ती बाळंत झाली. दुखावलेले कलंकीत मातृत्व लाभले म्हणून तिचें मन उद्विग्न झाले होते. मातृत्वाच्या ओढीनें त्या मुलाकडे बघतांना त्याच्या जन्मापाठीमागचा इतिहास तिला त्याचा तिरस्कार करावयास लावी. त्या चिमण्या जिवाचा तो निष्पाप चेहरा पाहून ती त्याला छातीशी कवटाळी. पण त्या निष्पाप जीवाच्या जन्मामागचें पाप तिचे अंतःकरण जाळून पोळून काढी. मनांत पुरुष द्वेषाची, तिरस्काराची, सूडाची भावना पेट घेई.

श्रद्धाच्या बाळंतपणाच्या दुसऱ्याच दिवशीं सकाळच्या आठच्या राउंडला ऑनररी सर्जन आले आणि नेहमींच्या सरावानें त्यांची पावलें श्रद्धाला ज्या पार्टीशन आड ठेवले होते त्या पार्टीशनकडे वळली. वार्डची मेट्रन सोबत होतीच.

श्रद्धानें डॉ. जोशीना पाहिले नि ताडकन अंथरुणावर उठून बसली ती. तिच्या कानांवर त्याच क्षणीं लोखंडाचे घण मारल्याप्रमाणें, अंतःकरण कांपणारे मेट्रनचें शब्द आले, 'सेंटरच्या अनैतिक बायकांपैकीं आहे. Illegitimate child ची केस. श्रद्धा तडफडली, तळमळली नि जोरांत तिनें स्टँडवरचा लोटा मेट्रनकडे फेकून मारला. आणि सर्व शक्ति एकवटून ती म्हणाली, 'हलकट, बदमाश, मी अनैतिक आणि असले हें नराधम, नीतिमान,—डॉ. श्रीधर जोशीकडे बोट दाखवीत ती ओरडली, 'ह्याचं बाळ आहे हें! ह्याचं—ह्या नराधमाचं!' आणि काय होत आहे हें लक्षांत येण्याच्या आंतच क्षणार्धांत तिनें पांच पौंडाचा तो नाजुक गोळा डॉ. श्रीधर जोशी ऑनररी सर्जन् ह्यांच्या पुढ्यांत धाडदिशीं आपटला. आपण काय केलें हे नंतर तिच्या लक्षांत आले. एकटक त्या निष्पाप मृतहीन गोळ्याकडे सारे प्राण डोळ्यांत एकवटून क्षणभर पहात असतांनाच श्रद्धाच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. तो तिच्या बाळाचा निष्पाप चेहरा तिला दिसेनासा झाला.




आणि जीवाच्या आकांतानें ती ओरडली, 'माझ्या बाळा रे!..

मेट्रनच्या किंचाळण्यानें वार्ड बॉय्, नर्सेस, पोलीस गोळा झाले होते.

पण तो सबंध दिवस तिच्या सर्व संवेदना बधीर झाल्या होत्या.

तुरुंगाच्या कोठडींत श्रद्धाची रवानगी करण्यांत आली. दहा वर्षें खुनाच्या आरोपाखाली तुरुंगवासाची शिक्षा झाली होती तिला.

कोर्टासमोर केस गेली होती. पण डॉ. श्रीधर जोशीचा संबंध ह्या घटनेशी जुळवण्याच्या प्रयत्नांत कुणीहि पडलं नाहीं.

श्रद्धाने दिलेल्या साक्षीला कुणी काडीइतकंहि महत्त्व दिलं नाहीं.

आणि कोर्टाचा निकाल लागल्याच्या दुसऱ्याच दिवशी डॉ. श्रीधर जोशी माझ्या खोलीच्या दारांत मला दिसले.

'बाई, मला तुमच्यांशी कांहीं बोलावयाचें आहे.' ते म्हणाले.

मी त्यांना बसावयास खुर्ची दिली आणि नकळत अरुंधतीच्या आणि श्रद्धाच्या आठवणींनीं माझे डोळे भरून आले. डोळ्यांतले पाणी गिळून टाकीत मी डॉ. जोशीना विचारले, 'काय बोलायचं आहे?'

'अरुंधती पवारचा मुलगा सेंटरमध्ये आहे का?'

'हो. कां?'

'त्याच्या पाठीमागें माझं नांव लावा आणि चांगल्या नर्सरी होममध्ये त्याला ठेवा. मी त्याच्यासाठीं सारा खर्च करीन.'

पण दहा वर्षांनीं परत येणाऱ्या श्रद्धासाठीं काय?—हा प्रश्न माझ्या डोळ्यासमोर उभा राहिला. थोडा वेळ थांबून डॉक्टरच पुढें बोलले. 'आतांपर्यंत अत्यंत वेळूटपणें वागलों मी. पण त्या दिवशीं तें माझं निष्पाप गोजिरवाणं मूल माझ्या पायाशीं येऊन पडलं आणि आणि मला काय वाटलं असेल तें माझं मलाच माहीत! माझ्या बेछूट वागण्याची शिक्षा ह्या लेकराला कां? अरुंधतीसारख्या कितीतरी स्त्रियांना ह्या शिक्षा भोगाव्या लागल्या असतील पण त्या दृष्टिआड झाल्या नि मी त्यांना विसरलो. पण माझ्या दृष्टिपुढें जें घडलं त्यांनीं माझे डोळे उघडले'...थोडावेळ थांबून डॉक्टर पुढें भावनांनीं ओथंबलेल्या पश्चातापदग्ध स्वरांत म्हणाले, 'मी श्रद्धाची वाट पहाणार आहे—दहा वर्षें. आणि श्रद्धा आली की तिच्या ओटींत हें अरुंधतीचं बाळ टाकणार आहे. श्रद्धाचा नि माझा संसार उभारणार आहे दहा वर्षांनीं. आणि दहा वर्षांतील प्रत्येक दिवस मी श्रद्धाची वाट पहात थांबणार आहे.'

डोळ्यांत सांकळलेले पाणी बोटांनीं टिपून काढीत डॉ. श्रीधर जोशी निघून गेले.

डोळ्यांतून ओघळलेल्या पाण्यानें माझंहि भारावलेलं मन शांत झालं.






अनंत काणेकर



# मार्च आला सप्टेंबरांत

अंक संपल्यावर दर्शनी पडदा पडला नाहीं. एक निळ्या रंगाचा पडदा पडला, त्यावर कांहीं अक्षरें होतीं. खुलासा करतांना मादाम म्हणाल्या— नट्यांच्या अभिनयावर खूष होऊन प्रेक्षकांनीं हा पडदा बहाल केलेला आहे. असे अनेक पडदे कंपनीजवळ आहेत.

नाटक आठला सुरू व्हायचें होतें. तेव्हां कपडे बदलून साडेसातच्या सुमारास प्रो. शिहच्या घरीं गेलों. मादाम् शिह काळ्या रेशमाचा तंग चॉंगसाम घालून नाटकाला जाण्यासाठीं तयारच होऊन राहिल्या होत्या. एक टॅक्सी बोलावून प्रोफेसर, मादाम आणि मी पॉंकिंग थिएटरकडे गेलों. थिएटरच्या दाराशीं चिनी स्त्रीपुरुषांची तुफान गर्दी दिसत होती, आणि हेल काढून आळसटपणें उच्चारल्या जाणाऱ्या 'चांगचुगचिव् चॉव' सारख्या चिनी शब्दांचा गलबला कानांवर येत होता. झकपक इंग्रजी कपडे केलेले चिनी या गर्दींत थोडे होते; बहुतेक तुकतुकीत काळ्या सदरा विजारींतले सामान्य चिनी स्त्रीपुरुषच होते. जुन्या तऱ्हेचें हें साग्रसंगीत पौराणिक नाटक असल्यामुळें कामगारांची खूपच गर्दी दररोज या नाटकाला लोटते म्हणे. पॉंकिंग थिएटरची इमारत जुनी पण भव्य आहे. मुंबईतल्या भांगवाडी थिएटरची मला आठवण झाली. लग्नसमारंभ असला कीं लाल सोनेरी काळ्या रंगाचें भलें थोरलें पांचसहा फूट लांबीरुंदीचें बाशिंगासारखें कांहींतरी झगझगीत चिनी लोक घराच्या दारावर बांधतात. तसलेंच अजस्र बाशिंग थिएटरच्या दरवाजावरहि दिसत होतें! दरवाजाच्या आसपास खांद्यावरल्या कावडीतून शेंगा, चणे, जांभळासारखीं कसलीं तरी फळें वगैरे चिनी फेरीवाले विकीत होते. नाटक चालू असतांनासुद्धां गळ्यांत पेट्या अडकवलेल्या चिनी बाया आणि पुरुष आग्रह करकरून सुका मेवा, मांसे मटनाचे सुके पदार्थ वगैरे विकीत मधून मधून फिरत होते, आणि प्रेक्षकहि नाटक पाहातांना हा कांहीं व्यत्यय आहे असें न समजतां हवें तें विकत घेऊन भरपूर खातपीत होते! खाणाऱ्या पिणाऱ्याला पदार्थांची बशी किंवा पेयाचा प्याला ठेवतां यावा म्हणून थिएटरवाल्यांनीहि मागल्या खुर्चीवरल्यासाठीं पुढल्या खुर्चीच्या पाठीला एक फळी लावलेली दिसली! आम्ही पहिल्याच रांगेंत असल्यामुळें रंगमंचाच्या अगदीं जवळ होतों. चिनी नाटकाचा सर्वत्र कारभार एकंदरींत आरामशीर असतो असें दिसतें. आमच्या डावीकडे रंगमंचावर विंगला लागून सर्व प्रेक्षकांना दिसेल अशा कोपऱ्यांत नाटकांतल्या संगीताची साथ करणारे वाद्यवादक बसले होते. नाटक पौराणिक किंवा कल्पनारम्य प्राचीन काळांतल्या वातावरणाचें होते; त्यामुळें पांढऱ्या शर्टपॅन्टमधल्या व्हायोलिन, सॅक्सोफोन वगैरे पाश्चिमात्य वाद्यें घेऊन बसलेल्या, मधून मधून सिगारेट फुंकीत, चहा पीत असलेल्या, आणि स्टेजवरल्या रिकाम्या नटनटींशीं डोळे मिचकावून हंसणाऱ्या खिदळणाऱ्या कोंपऱ्यांतल्या त्या लोकांना पाहून कसेंसेंच वाटत होतें!

कडकडा ताशे झडल्याचा आणि तुताऱ्या फुंकल्या गेल्याचा आवाज झाला आणि आठ वाजून वीस मिनिटांनीं दर्शनी पडदा वर गेला. स्टेजवर गुजराती नाटकांत असते तशी डोळे दिपवणारी झगझगीत प्रकाशयोजना होती. एका बाजूला खिडक्या दरवाजे वगैरे रंगवलेले होते, तर दुसऱ्या बाजूला पानें झडलेले



एक चेरीचें झाड आणि एक वेली लोंबत असलेला मोठा थोरला वृक्ष उभा केलेला होता. पात्रें घरांत बोलतांना डाव्या बाजूला उभीं राहून किंवा बसून बोलत; बाहेर बागेंत बोलणारीं पात्रें उजव्या बाजूच्या वृक्षाखालीं किंवा चेरी झाडाजवळ बोलत. घर आणि बागेच्यामध्यें कसलाच आडपडदा किंवा मागेंपुढें कांहींच नव्हतें. दिवाणखाना आणि

भाग एकाच ठिकाणीं होतीं; तीं वेगळीं आहेत, मागेंपुढें आहेत, दिवाणखान्याच्याच एका कोपऱ्यांत वृक्ष वगैरे उगवलेले नाहींत, हें सर्व प्रेक्षकांनीं आपल्या कल्पनेनें जाणायचें! दिवाणखान्याच्यामध्यें दोन तांबड्यालाल कापडाच्या खुर्च्या आणि लाल रंगाचेंच एक जुनाट टेबल होतें. चिनी भाषेंतलें नाटकासंबंधींचें एक हॅन्डबिल दरवाजावर मला मिळालें होतें. तें दाखवून नाटकाचें नांव काय म्हणून मी मादाम शिहना विचारलें. चिनी भाषा चित्रलिपींत लिहिलेली असते त्यामुळें उच्चारानें अर्थ समजत नाहीं तर चित्र पाहून कांहीं तरी अर्थ वाचणाराच्या मनांत उतरतो असें मला वाटतें. मादाम म्हणाल्या, नाटकाचें नांव 'मृत हंस नवव्या महिन्यांत परतून येतो.' असें असावें–कदाचित् मार्च-सप्टेंबरांत परतून येतो,' असेंहि असेल!

नाटक सुरू झालें. मादाम किंवा प्रोफेसर शिहनां मी मधून मधून विचारीत होतों; पण भाषा मुळींच समजत नसल्यामुळें कपडेलत्ते, हावभाव आणि मादामनीं अधून मधून दिलेल्या सूचना यांच्या आधारानें माझ्या डोळ्यांवर आणि कानांवर जे कांहीं संस्कार झाले ते सांगण्याचा प्रयत्न करतों. दर्शनी पडदा वर गेला तेव्हां एक साधा प्रवेशाचा पडदा आणि समोर एक मायक्रोफोन उभा असलेला दिसला. चिनी स्त्रीसारखा दिसणारा ज्याच्या भादरलेल्या मिशांचा हिरवेपणा स्पष्ट दिसत होता—एक म्हातारा हिजडा ठुमकत ठुमकत मायक्रोफोनजवळ आला आणि 'धा थिक् था'च्या तालावर आपल्याकडला कथ्थक नाच्या जसे बोल म्हणतो तसा एक स्वगत बोलूं लागला. तें स्वगत नव्हतें. आपण कोण, आतां काय होणार वगैरे कथानकाचे धागे तो सांगत होता. घरांतली ती म्हातारी मोलकरीण किंवा दासी होती. असलीं कामें पुरुषनटानांच देण्यांत येतात म्हणे! त्याचें,–चुकलें,–तिचें बोलणें संपल्यावर मागला पडदा वर गेला, आणि तें घर, चेरीकाड, लाल टेबल-खुर्च्यांचा देखावा डोळ्यांसमोर आला.

झगझगीत रूपेरी झग्यांतली मेणाच्या रेखीव बाहुलीसारखी सुंदर दिसणारी नायिका वेलीसारखी लवलवत रंगभूमीवर आली. तिची रंगभूषा मासलेवाईक होती. दोन्हीं भुंवया दोन टोंकांना वर वेतल्यामुळें कपाळाचा गोरापान त्रिकोण झाला होता. नाक आणि कपाळ गोरें गोरें तर निमुळत्या हनुवटीपर्यंत गाल तांबडेलाल रंगवले होते. कथाकली नृत्य-नाट्यांतल्या पात्रांप्रमाणें ती कळसूत्री बाहुलीसारखीच चालत बोलत होती. मला वाटतें ती संगीतांतूच बोलत होती; कारण तिच्या तांडांतून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक चरणाला कोपऱ्यांतले वाद्य वाजवणारे संगीताची साथ देत होते. एखादा जोरदार चरण सुरू होण्यापूर्वी किंवा एखादा जोरदार चरण संपल्यावर पोरें जस्ताचे डबे बडवून जसे 'ताड् ताड् तडम् तडम्' असे कानठाळ्या बसवणारे आवाज काढतात तसे आवाज संगीताचे साथीदार काढायचे 'शिंग् वांग, डुंग वाँग, मांय् कुंट् लिंग सांग' असलें कांहीं तरी तें नायिकेचें भाषण किंवा गाणें संपलें आणि तरुण नायकानें प्रवेश केला. नायक मॅन्डारिन चिनी वेषांत—म्हणजे भरजरी पोकळ सदरा आणि तशीच भरजरी पोकळ. विजार, डोक्यावर लखलखणारी मध्यें गुंडी असलेली गोल टोपी, आणि हातांत लखलखणारा पंखा—अशा वेषांत कळसूत्री बाहुल्यासारखाच खटक्यांत चालत आला. नायक उंच दिसावा म्हणून कीं काय त्याच्या पादत्राणांना चांगला दोन अडीच इंच उंचीचा रबरी प्लॅटफॉर्म लावलेला दिसला! मादाम म्हणाल्या, नायक राजघराण्यांतला आहे. ती झग्यांतली नायिका सामान्य घराण्यांतली होती. नायकानें कांहीं तरी भाषण केल्यावर ती नायिका वेलीसारखी डुलत बाहेर आली होती तशीच वेलीसारखी आंत गेली. ती आंत जातांना संगीतवादकांनीं कांठ्यानीं भांडीं झोडपावीं तसा प्रचंड दणदणाट केला. तो तिच्या निष्क्रमणासाठीं होता कीं दुसऱ्या नायिकेच्या प्रवेशासाठीं होता कुणास ठावूक; कारण तितक्यांत झगझगीत निळ्या झग्यांतली एक सुंदर नायिका रंगभूमीवर डुलत आली; आणि नायकाशीं कथाकली हालचालींत चिनी प्रणयालाप करूं लागली. ती म्हणे चिनी सम्राटाच्या रखेलीची पुतणी तुझ्यासारख्या राजघराण्यांतल्या कुमारानें त्या रुपेरी झग्यांतल्या सामान्य कुळांतल्या तरुणीच्या प्रेमांत पडावे हें बरोबर नाहीं, अशा अर्थाची ती नायकाची निर्भत्सना करूं लागली. नायक संतापत होता. मधून मधून निळी नायिका खिन्न होत होती. इतक्यांत शेक्सपियरच्या फॉल्ट स्टॉफसारखा दिसणारा नायकाचा लठ्ठ गमत्या बाप येतो. त्याचा चेहरा अगदीं साधा रंगवलेला होता; पण त्याचे कपडे मजेदार होते. फुलांचा कशीदा असलेली सफेत रेशमी कापडाची तंग सुर्वार त्यानें घातली

होती. त्यावर सफेत रेशमी सदरा; आणि त्यावर रुपेरी, सोनेरी काम केलेलें झगझगीत कुडतें. मुकुटासारखी लखलखणारी टोपी त्याच्या डोक्यावर होती. त्याच्या कुडत्याच्या छातीवर जरतारी कोंबडा होता! तो यायच्या आधीं रुपेरी नायिकाहि आलेलीच होती. म्हाताऱ्याला निळी नायिका कांहीं तरी सांगून भडकवते. तो नायकाला टेंकून बोलूं लागतो. तितक्यांत तो रुपेरी नायिकेला पहातो. तो खूप होतो. हिच्यावर आपण रागावूंच शकत नाहीं म्हणतो. ती चहाचा पेला आणते. गुडघे टेकून त्याला देऊं लागते. तिच्याकडून त्यानें चहाचा पेला घेतला तर आपली सून म्हणून त्यानें तिचा स्वीकार केला असें समजायचें, मादाम म्हणाल्या. चहा नको म्हणून तो खुर्चीवरून उठतो, आणि मुलाशीं कांहीं तरी बोलूं लागतो. गंभीर बोलतो, आणि सबंध थिएटरांत हास्याचे कल्लोळ उठतात असें डोळे मिचकावून विनोदीहि बोलतो. मला वाटतें तो संगीतांत बोलत होता; कारण मधून मधून तो बारीकशा ताना मारीत होता. भाषा समजत नव्हती, पण चापाचें काम करणाऱ्या या नटाची एकंदर चलाखी आणि डोळ्यांची फिरत इतकी सफाईदार होती, कीं मला क्षणोक्षणीं आमच्या गणपतराव बोडसांची आठवण होत होती. प्रेक्षक तर या नटावर बेहद्द खूष होते. अर्थात् तें योग्यच होतें. नायक, दोन नायिका यांचाहि अभिनय सांकेतिक पद्धतीचा असला तरी परिणामकारक आणि आकर्षक होता. भाषा समजत नव्हती पण कंटाळा येत नव्हता. नाटकाची लय चांगली होती.

चहा नाकारून बाप नायकाशीं बोलूं लागला तेव्हां रुपेरी नायिका आंत गेली, आणि हिरव्या रेशमाच्या सदरातुमानींतल्या आणि लाल कुंचल्यांतल्या गुबगुबीत बालकाला पोटाशीं धरून बाहेर घेऊन आली. नायकाशीं तिचें लग्न होऊन तिला मूलहि झालें होतें. आम्हांला हें कांहींच माहीत नव्हतें. तें मूल अर्थात् मोठी थोरली बाहुली होती. पण लांबून खऱ्या मुलासारखें दिसत होतें, आणि वाटतहि होतें. कारण मधून मधून नायिका मुलाला 'उगीं उगीं' करायची, आणि कोपऱ्यांतले संगीत वादक आपल्या व्हायोलिनवर मुलाच्या रडण्यासारखा हुबेहूब 'क्याव्—क्याव्—' असा आवाज काढायचे! नातवाला पाहिल्याबरोबर म्हातारा खूष होतो, आणि सुनेला 'एकच नातू?' म्हणून डोळे मिचकावून विचारतो! नातवाला जवळ घेऊन त्याचे मुके घेतो. पहिला नातू दिसला कीं चिनी आजोबा फार खूष होतात, मादाम म्हणाल्या निळी नायिका चिडून म्हाताऱ्याला अद्वातद्वा बोलूं लागते. तेव्हां म्हातारा तिला म्हणतो, 'तूं आतां याची मावशी हो!' प्रेक्षकांत खूप हंशा पिकतो. म्हाताऱ्याखेरीज रंगभूमीवरून सर्व निघून जातात; आणि म्हातारा अंकाच्या सुरूवातीला ती म्हातारीं दासी म्हणते तशा-प्रकारचें एक तालबद्ध स्वगत बारीक बारीक ताना मारीत संगीताच्या साथींत प्रेक्षकांना उद्देशून म्हणतो. इथें पहिल्या अंकाचा पडदा पडतो. नेहमीचा दर्शनी पडदा पडला नाहीं. एक निळ्या रंगाचा पडदा पडला त्याच्यावर कांहीं अक्षरें होतीं. मादाम म्हणाल्या, नायिकेचें काम करणाऱ्या नटीच्या अभिनयावर खूष होऊन प्रेक्षकांनीं हा पडदा बहाल केलेला आहे. असे अनेक पडदे कंपनीजवळ आहेत.

दुसरा अंक सुरू. चीनच्या बादशहाचा हा राजवाडा आहे. राजवाड्याच्या मधल्या दरवाजाच्या दोन बाजूंना दोन मुंडन केल्यासारखे दिसणारे चिनी सिंह दिसतात. दरवाजावरल्या कमानीच्या मध्यभागीं आपल्याकडल्या कमानीवर जशी गणेशमूर्ति असते तसे इथें दोन कावळे आहेत! काळीं अक्षरें असलेले लाल चौकोन टोकांशीं लावलेल्या दोन उंच काठ्या राजवाड्याच्या दरवाजाशीं आहेत. 'आवाज करूं नका' असें कांहीं तरी त्या चौकोनांवर लिहिलेलें आहे म्हणे. तांबड्या, काळ्या, सोनेरी रंगाचे चिनी आकाश दिवे राजवाड्यांत ठिकठिकाणीं टांगलेले दिसले. मात्र मध्यें दिसणाऱ्या जुनाट लाल टेबलखुर्च्या पहिल्या अंकांतल्याच होत्या! पडदा वर गेल्याबरोबर लांब कानाच्या चित्रविचित्र टोप्या घातलेले बादशहाचे चार दरबारी प्रवेश करतात. त्यांच्या मागून आमच्याकडल्या 'मानापमान' किंवा 'पुण्यप्रभाव' नाटकांतल्या शिपाईप्याद्यांसारखे रंगीबेरंगी चट्ट्यापट्ट्याच्या कपड्यांतले शिपाई येतात. बादशहा प्रवेश करतो. त्याचे केस पांढरेशुभ्र आहेत. चकमकणारे रुपेरी खवले असलेला पांढऱ्या रेशमांचा त्याचा वेष आहे. त्याच्या मागें लांब दांड्याच्या ताडपत्री पंख्यासारखे दिसणारे लाल रंगाचे अबदागीर धरून दोन मुलगे फिरतात. शंकराचार्यांच्या, भगवें फडकें बांधलेल्या काठीसारखा दिसणारा एक लांबच लांब, पण किरकोळ राजदंड बादशहाच्या हातांत आहे. रंगभूमीवर तडतडाट,

तरीहि संयुक्त महाराष्ट्र झालाच !......६



" सं. महाराष्ट्राच्या चळवळींत ' मांगल्याची होळी ' झाली—"
इति शंकरराव देव

झणझणाट होतो, आणि उदयशंकरच्या तांडव नृत्यांतल्या शंकरासारखीं पावलें टाकीत बादशहाचा सेनापति प्रवेश करतो. रुपेरी आणि पांढऱ्या रंगाचे पट्टे असलेल्या लांबलचक म्यानांत त्याची भली मोठी तलवार आहे. बादशहाच्या रखेलीची पुतळी असलेली ती निळी नायिका प्रवेश करते, आणि पहिल्या अंकांतल्या नायकाविरुद्ध बादशहाकडे तक्रार करूं लागते. इतक्यांत तिचे लक्ष सेनापतीकडे जातें; आणि ती त्याच्या प्रेमांत पडते. सेनापति आश्चर्यचकित होतो, आणि संतापतो. आपल्या रखेलीच्या पुतळीशीं त्या झगझगीत निळ्या कपड्यांतल्या नायिकेशीं तूं लग्न केलेंच पाहिजेस, असा सेनापतीला बादशहा हुकूम करतो. झालें. तिथेंच लग्नविधि सुरू! निळी नायिका सोनेरी जरतारीचे एक कापड आणि लाल किनारीचा एक लांबलचक रेशमी गळपट्टा घेऊन येते. सेनापती कपाळावर हात मारून म्हणतो, हा माझा लग्न विधि नसून अंत्यविधि आहे! पण कांहीं कळत नाहीं. व्हायचें तें होतें. पिंपाच्या भोंवतीं पट्टया असतात तशा आडव्या लाल पट्टयांचें सफेत कपडे घातलेली दरबारी वधूवराच्या भोवतीं उभे रहातात. मोठमोठीं भांडीं खणाणून बडवल्याचे आणि कर्कश तुताऱ्यांचे कानटाळ्या बसवून टाकणारे आवाज होतात; आणि सेनापतीचें निळ्या नायिकेशीं लग्न होतें!

तिसऱ्या अंकांत पहिल्या अंकांतल्या नायकाचा म्हातारा बाप नातवाला मांडीवर घेऊन आपल्या घरांत, बसलेला दिसतो. चिनी मुलाच्या जीवनांतला शंभरावा दिवस पहिल्या वाढदिवसापेक्षां महत्त्वाचा समजतात. म्हाताऱ्याच्या नातवाचा शंभरावा दिवस आहे. समोर एक लांबलचक लाल रंगाचा चौकोनी फडका आहे. त्यावर कांहीं अक्षरें आहेत. आज पूर्वजपूजा करायची म्हणून तो फडका लावलेला आहे. म्हातारा नातवाला घेऊन बसला आहे. तिथें लाल टेबलावर दोन मेणबत्त्या आणि बशींत दोनतीन सफरचंदें आहेत. मुलाचा बाप म्हणजे नायक तिथें येऊन उभा रहातो. म्हातारा नातवाला घेऊन पूर्वजांपुढें गुढघे टेकतो. इतक्यांत निळ्या नायिकेशीं लग्न झालेला सम्राटाचा सेनापति तलवार परजीत तिथें येतो. नायकानें आपल्या रखेलीच्या पुतळीला नकार दिला म्हणून रागावून या सर्व कुटुंबाचा शिरच्छेद करण्याचा हुकूम सम्राटानें सेनापतीला दिला आहे! सेनापतीबरोबर दोनचार शिपाईहि आहेत. चिनी रंगभूमीवरल्या संकेताप्रमाणें सेनापति आणि त्याचे शिपाई तिथें उभे असून म्हाताऱ्याला किंवा नायकाला दिसत नाहींत; कारण मध्यें एक दरवाजा आहे अशी कल्पना करायची. नायक बळतो आणि दरवाजाच्या बाहेर आल्याचा अभिनय करतो तेव्हां त्याला सेनापति आणि त्याचे शिपाई दिसतात. सेनापति त्याचा बालपणीचा मित्रच आहे. फार काय, ज्या रुपेरी नायिकेशीं त्यानें लग्न केलें आहे तिच्यावर तिचें लग्न होण्यापूर्वी सेनापतीचें प्रेम होतें. ते एकमेकांना पहातात, आणि काय करावें तें सेनापतीला समजत नाहीं. तो किंकर्तव्यतामूढ होतो. आजोबांच्या खांद्यावर मातू रडूं लागतो — म्हणजे कोपऱ्यांतले संगीतवादक व्हायोलिनवर 'क्यांव् क्यांव्' आवाज काढूं लागतात. आजोबा पुढें होऊन कांहीं तरी विनोदी बोलतो; आणि नातवाला सेनापतीच्या हातांत देतो. सेनापतीच्या अंतःकरणांत कालवाकालव होते. सम्राटाचा आदेश पाळावयाचा नाहीं असा निश्चय करून सेनापती आपली झगझगणारीं सेनापतीचीं वस्त्रें ओरबाडून काढतो, आणि फेकून देतो. त्याच्या अंगावर फक्त एक साधा पांढरा सदरा आणि विजार रहाते. इतक्यांत साध्या पांढऱ्याच वेषांत मुलाची आई, म्हणजे रुपेरी नायिका तिथें येते. मुलाचा बाप आंत गेलेला असतो. नायिकेचा सेनापतीवर विश्वास बसत नाहीं. माझ्यावरल्या तुझ्या प्रेमाचें द्वेषांत रूपान्तर झालें आहे, ती सेनापतीला म्हणतें. एक लांबलचक भाषण करून सेनापती तिला टाकून बोलत असतो, इतक्यांत नायक म्हणजे तिचा नवरा तिथें येतो. सेनापति तलवारीनें त्याच्या दंडावर वार करतो. नायिका बेशुद्ध होऊन पडते. लांबलचक भाषण करून थकलेला सेनापती रंगभूमिच्यामागें जाऊन प्रेक्षकांकडे पाठ करून उभा राहतो. तो श्वास घेत असतो. रंगपटांतला किंवा कपडेपटांतला एक लांडी विजार, गंजीफ्रॉक घातलेला नोकर सेनापतीला चहाचा कप आणून देतो. प्रेक्षकांकडे पाठ करून सेनापति तो खुशाल पिवून टाकतो. संकेत सर्व प्रेक्षकांना मान्य असल्यामुळें या गोष्टीचें त्यांना कांहींच वाटत नाहीं! इतक्यांत सेनापतीची बायको, म्हणजे ती निळी नायिका तिथें येते. तिचें आणि सेनापतीचें कडाक्याचें भांडण होतें. सेनापति तांडवनृत्यच करतो म्हणाना! तो तिचा गळा दाबतो, आणि ती धाडकन् मरून पडते.








मृत माणसाचा अभिनय करणाऱ्या नटीला त्रास होऊं नये म्हणून सेनापतीला चहा आणून देणाऱ्या नोकरासारखाच एक लांडी विजार गंजीफ्रॉक घातलेला नोकर एक उशी घेऊन रंगभूमीवर धांवत येतो, आणि मेलेल्या निळ्या नायिकेच्या मानेखालीं ती अलगद ठेवतो. मी पहिल्या रांगेंत असल्यामुळें आपले भिमुकल्या बदामासारखे डोळे हळूच उघडून मेलेली नायिका त्या उशी ठेवणाऱ्या नोकराकडे पहात असलेली मला दिसली. हाहि संकेत प्रेक्षकांना मान्य असल्यामुळें त्यांना या सर्व प्रकाराचें कांहींच वाटत नव्हतें! नायकाचीं, नायकाच्या म्हाताऱ्या बापाचीं एक-दोन भाषणें झालीं आणि तिसऱ्या अंकाचा पडदा पडला.

चौथ्या अंकाच्या प्रारंभाला पहिल्या अंकाच्या प्रारंभीं आलेली हिजड्यासारखी दिसणारी ती दासी आली, आणि तिनें एक लांबलचक तालबद्ध भाषण केलें. मला वाटतें उशीरा येणाऱ्यासाठीं आतांपर्यंत झालेल्या तीन अंकांत काय झालें तें तिनें सांगितलें असावें. आतां मात्र कथानक माझ्या डोक्यावरून जाऊं लागलें. नायिकेचा मुलगा आतां आठ वर्षांचा झालेला असतो. त्याच्या बापाला म्हणजे नायकाला सम्राटानें बरासून एक हजार मैल दूर हद्दपार केलेला असतो. हा हुकूम मोडून तो मुलाला, बायकोला भेटायला परत आला तर त्याला तावडतोब तीर मारून ठार करायचा हुकूम असतो. दासीचा प्रवेश झाल्यानंतर तुरुंगासारखा देखावा डोळ्यासमोर आला. तो आठ वर्षांचा मुलगा सम्राटानें स्थानबद्ध करून ठेवलेला असावा. सम्राटाच्या वाढदिवशीं आई किंवा आजोबा त्याला भेटूं शकत. आज तीं दोघे त्याला भेटायला आलीं होतीं. इतक्यांत निळी नायिका—आपण आतां तिला खलनायिका म्हणूं—तिथें येते. एकच वेताची काठी सर्व प्रेक्षकांना नीट दिसणार नाहीं म्हणून मारा-









यला येणाराच्या हातीं चारपांच वेताच्या काठ्या एकत्र बांधून त्याचा जुडगा देण्याचा चिनी रंगभूमीचा संकेत असावा. खलनायिका झाडूसारखा दिसणारा असा एक जाडजूड जुडगा घेऊन त्या मुलाला मारझोड करायला येते. (गळा दाबून तिसऱ्या अंकाच्या शेवटीं तिच्या नवऱ्यानें म्हणजे सेनापतीनें तिला ठार केलें होतें त्याचें काय झालें?—कीं गळा दाबून तिला नुसती बेशुद्ध केली होती, आणि मी ती मेली असें समजलों? जाऊं द्या. फार विचार करण्यांत अर्थ नाहीं!) म्हातारा आजोबा खलनायकाशीं डोळे मिचकावीत गमतीनें बोलत असतो. इतक्यांत सेनापति तिथें येतो. ही सर्व मंडळी आपसांत बोलत असतां हजार मैल दूर हद्दपार केलेला नायक भिकाऱ्याच्या वेषांत येतो. त्याला पहिल्यांदा कुणी ओळखीत नाहीं! पण म्हाताऱ्याला त्याची ओळख पटते. त्यासरशीं नायकाला इतका आनंद होतो कीं एका आठ वर्षांच्या मुलाचा बाप असलेला तो प्रौढ पुरुष टुणकन् उडी मारून बापाच्या कडेवर बसतो, आणि त्याच्या गळ्याला मिठी मारतो! बाप त्याला खालीं उतरतो, आणि संतापून म्हणतो, 'अरे मूर्खा, तूं हुकूम मोडून इथें आला आहेस हें बादशहाला कळलें तर ताबतोब तिरंदाज धाडून माझ्या पुढ्यांत तो तुझा मुडदा पाडील त्यापेक्षां नदींत उडी मारून जीव दे!' (मादामनीं म्हाताऱ्याच्या भाषणाचा हा इत्यर्थ मला सांगितला हें सांगावयाला नकोच!) इतक्यांत बादशहाचे तिरंदाज तिथें येतातच. ते तीर सोडतात. पण मुलगा निसटून जातो, आणि म्हाताऱ्या बापाला तीर लागून मरून पडतो. आठ वर्षांचा तो मुलगा स्वतःच्या आईला ओळखत नाहीं. इथें चौथा अंक संपला.

पांचवा अंक अगदींच छोटा होता. तुरुंगाची खोली. साखळदंडांनीं हातपाय जखडलेली मुलाची आई,—ती नायिका कांटेरी शय्येवर पडलेली होती. लाल-काळ्या पट्ट्यांचे कपडे घातलेले दंडुकाधारी पहारेकरी इकडून तिकडे फिरत होते. लाल फुलांच्या माळा घातलेल्या चारुदत्ताला वधस्तंभाकडे नेतात त्या दृश्याची मला आठवण होत होती. इतक्यांत हजार मैल दूर हद्दपारीची शिक्षा झालेला,—मध्यंतरीं भिकाऱ्याच्या वेषांत आलेला तो नायक चांगल्या झगझगीत रूपेरी वेषांत तिथें येतो. तो कांहीं तरी बोलत होता, इतक्यांत मी मनगटावरल्या घड्याळांत पाहिलें तों साडेअकरा वाजले होते. कांहीं दुरुस्तीचें काम असल्यामुळें रात्रीं बारा वाजतां बोटीवरले सर्व दिवे जाणार म्हणून नोटीस लावलेली होती. तेव्हां मी जायला उठलों. प्रोफेसर आणि मादाव शिहचा निरोप घेतला. नाटक केव्हां संपेल म्हणून मी विचारलें तेव्हां शिह म्हणाले, त्याचा कांहीं नेम नाहीं; आणखी दीड दोन तास सहज चालेल.

बाहेर येऊन टॅक्सी घेतली, आणि बाराच्या आंत बोटीवर माझ्या केबिनमध्यें येऊन पोहोचलों.

• • •





अनुक्रमणिका









## एक पानी कथा

# चमत्कार !

स्थानकांत मेल गाडी येऊन थांबली. तेव्हां संध्याकाळचे ५॥ वाजले होते. इंजिनापासून गार्डाच्या डब्यापर्यंत प्रत्येक डब्याचें बारीक निरीक्षण करीत संज्यानें एक फेरी मारली. तिसऱ्या वर्गाचे डब्बे खच्चून भरले होते. दुसऱ्या वर्गात कांहीं तुरळक कुटुंबे होतीं. आणि पहिल्या वर्गात मात्र चिटपांखरूंहि नव्हतें रुमालाचीं टोकें दोन्ही हातांत धरून रुमाल गळ्याभोंवतीं घोळवत चेकरला डोळा घालून संज्या बाहेर आला. बाहेर वाट पाहात उभ्या असलेल्या खलनायकासारख्या दिसणाऱ्या माणसाला 'कांहीं नाहीं' अशा अर्थी मान हलवून कांहींतरी सांकेतिक असें तो बोलला, इतक्यांत एक काळीशार चकचकीत मोटार येऊन स्थानकाबाहेर उभी राहिली. ड्रायव्हरने लगबगीनें येऊन दार उघडतांच, पन्नाशी उलटलेले एक सेठजी गाडींतून उतरले आणि सरळ पहिल्या वर्गाचीं तिकिटें विकणाऱ्या खिडकीशीं येऊन आंतल्या खिशांत हात घालून पाकीट काढीत ते म्हणाले, "एक कलकत्ता" आणि पाकीटांतून नोटांचें एक जाडजूड बंडल काढीत त्यांतली शंभरांची एक नोट काढून त्यांनीं खिडकींतून आंत सरकवली.

संज्याच्या डोळ्यांनी तें सारें टिपलें होतें. चोख अंदाज घेतला होता. त्या खलनायकासारख्या दिसणाऱ्या माणसाजवळ त्यानें कांहींतरी घेतलें. कुणीतरी कुठूनतरी आणून त्याला बिछाना आणि बॅग दिली. आणि तिकिट घेऊन संज्यानें पहिल्या वर्गाच्या डब्यांत पाऊल टाकलें.

"या बाबा या ! आलांत ? आतां हा एवढा लांबचा प्रवास एकट्यानें कसा करावा ? याचीच काळजी पडली होती मला. माझं नांव विठ्ठलदास सेठ. कलकत्त्याला पेढी आहे माझी. उद्यां तिथें पोचेन तिथले हिशोब पाहीन. आणि उद्यां रात्रींच परत निघणार. आपणहि कलकत्त्यालाच निघालांत ना ?"

"होय मीहि महत्वाचं काम आटोपून उद्यांच्या उद्यांच परतणार आहे."

"बरं झालं येतां जातां सोबतीचा प्रवास होईल माझा ! चहा मागवतों हां ?" असें म्हणून संज्याच्या होकारा नकाराची वाटहि न पाहतां सेठजींनीं स्पेशल चहाची ऑर्डर दिली. चहा आला, सेठजींनीं एक कप संज्याला देऊन दुसरा आपण घेतला. आंतल्या खिशांत हात घालून सेठजींनी पाकीट काढलें आणि पांचांची एक नोट काढून वेटरच्या हातावर ठेवली, आणि म्हणाले, "बाकीचे राहूं दे बाळा तुझ्याजवळ." पायाला हात लावून नमस्कार करून वेटर गेला.

"अहो पण खालची ती बर्थ रिकामी असतांना तुम्ही या वरच्या बर्थवर कां झोंपतां ?" सेठजी म्हणाले.

"मला वरच्या बर्थवर चांगली झोंप येते. असं बोलून वरच्या बर्थवर त्यानें आपलें बेडींग आंथरले देखिल.

बोलतां बोलतां नऊ वाजले. कुठल्यातरी चांगल्या स्टेशनवर गाडी उभी राहिली. सेठजींनींच जेवण मागवलें. यावेळीं पैसे आपण देणार असा जरी संज्यानें आग्रह धरला तरी सेठजींनीं खिशांतून आपलें जाडजूड पाकीट बाहेर काढून त्यांतली दहा रुपयांची एक नोट काढून वेटरच्या हातावर ठेवलीच.

"तुम्हांला कांहीं पाहिजे आहे का ?" आतिथ्यानें भारावलेल्या संज्यानें विचारलें.

"तसं कांहीं नाहीं, खालीं उतरणार असल्यास पलीकडल्या नळावरून तेवढा हा लोटा भरून आणा."

संज्या पाणी घेऊन येईतोंपर्यंत सेठजी पेंगायला लागले होते. दहा वाजले, अकरा वाजले, आणि बाराहि वाजून गेले. वरच्या बर्थवर चुळबूळ करणारा संज्या खालीं उतरला त्यानें सेठजींचे आंतले बाहेरचे सगळे खिसे तपासले. अंथरूण तपासलें सुटकेस तपासली. डब्यांतला कोंपरान् कोंपरा धुंडाळला, पण पाकीट कांहीं त्याला सांपडलें नाहीं. सेठजी डाराढूर झोंपले होते. अखेर पहाट झाली. सेठजींना जाग आली.

"उठतांना बाबा, कलकत्ता जवळ येत चालला. पुढच्या स्टेशनवर आपण चहा घेऊं उठा !" निराशेच्या जागरणानें वैतागलेला संज्या पुकाऱ्यानें खालीं उतरला आणि चूळ भरण्याकरितां नळावर गेला. पुढच्याच स्टेशनवर सेठजींनीं चहा मागवला आणि आंतल्या खिशांतून पाकीट काढून त्यांनीं वेटरच्या हातावर नोट ठेवली. तांबडलेल्या भकास नजरेनें संज्या सेठजींकडे पाहातच राहिला.

आपलें काम आटोपून सांगितल्याप्रमाणें सेठजी स्टेशनवर आले. सुदैवानें याहि खेपेस डब्यांत, दोघांव्यतिरिक्त कोणीहि नव्हतें. गेल्या खेपेप्रमाणें सेठजींनीं चहा मागवला. आणि आंतल्या खिशांतलें पाकीट काढून वेटरच्या हातावर नोट ठेवली. या खेपेस त्यांचें तें पाकीट टच्च फुगलेलें होतें. जेवण झाल्यावर संज्यानें गुंगीचें औषध घातलेलं पान सेठजींना दिलें. तें पान खाल्ल्यावर सेठजींना भयंकर उचकी लागली '[redacted] थोडं या लोट्यांतून पाणी भरून आणून द्या !" शेठजी म्हणाले.

खाल्लेल्या अन्नाला जागायचं म्हणून संज्यानें सेठजींना पाणी आणून दिलें. आणि लवकरंच घोरूं लागलेल्या सेठजीवर त्यानें पुन्हा आपला प्रयोग करायला सुरवात केली. बिछाना बॅग, गाद्या, डब्याचा कोपरान् कोंपरा, संडास सगळें सगळें त्यानें पांचसहा वेळां धुंडाळलें; पण छे ! पाकीट नाहीं ! हा काय चमत्कार ?

\+ + +

"बेटा, काल पासून मी पाहातोंय तुझं कांहीं तरी बिनसलंय. कालच्या पेक्षां तूं आज अधिक भकास वाटला मला, तुझं काय झालंय ? मला सांग ! मीं तुझी अडचण शक्यतों निवारण करीन" संज्याला आपल्या जवळ घेऊन त्याच्या पाठीवरून सहानुभूतिचा हात फिरवीत सेठजी म्हणाले. संज्याला अगदीं गहिंवरून आलें. सेठजींच्या समोर आपले गुढघे टेंकून तो म्हणाला "माफ करा सेठजी; पण माझ्या अस्वस्थतेचें खरें कारण तुमचें पाकीट ! मी खिसेकापू आहे. सेठजी, मी खिसेकापू आहे. !

सेठजी खो खो हांसले, आणि म्हणाले, "बेटा आयुष्यांतील तब्बल २४ वर्षे मीहि हाच धंदा केला आहे" एक प्रचंड काळा पडदा संज्याच्या डोळ्यांच्या पापणीवरून अलगद खालीं येत होता, सेठजींनीं त्याला सावध केला आणि म्हणाले, "अरे, काल तूं गाडींत चढलास त्याच वेळेला मी सगळं कांहीं ओळखलं होतं !"

"पण तुम्हीं तें पाकीट ठेवत होतां तरी कुठें ?" मोठ्या कुतुहलानें संज्यानें विचारलें.

सेठजी उठले, आणि वरच्या बर्थवरील संज्याच्या बिछान्याखालीं हात घालून खसकन् पाकीट ओढून काढीत म्हणाले, 'माझं हें पाकीट मीं इथें ठेवित होतो !"

"पण माझा जागता पाहारा असतांना, तुम्हीं हें तिथें ठेवत होतां तरी केव्हां ?"

"हा माझा लोटा घेऊन तूं बाहेरून मला पाणी आणून देत होतास तेव्हां !"

(आधारित)

गोपाळकृष्ण भोबे

# पडछाया

## आणि त्यावरच्या टीकाकारांच्या छाया



डॉ. ऊ. शे

आजकालच्या मराठी समीक्षणांकडे नजर टाकली तर वाचकाला उघडउघड दोन प्रकारचे टीकाकार वावरत असतांना दिसतात. एक लेखकाला ललामभूत मानून त्याचें प्रत्येक वाक्य, कल्पना कथानक आणि शैली उच्च प्रतीची आहे असें गृहीत धरूनच त्याच्या कलाकृतीला सर्वश्रेष्ठ ठरविण्यासाठीं तरतमभावयुक्त विशेषणें आपल्या समीक्षणांत पेरीत असतो. ह्याउलट दुसऱ्या प्रकारचा समीक्षक शस्त्रक्रिया विशारदाचा वेष चढवून आपल्या तीक्ष्ण व बोंचक लेखणीनें कलाकृतीचें शवच्छेदनच जणुं करत आहोत ह्या आवेशानें हत्यार चालवित असतो. ह्यामुळें सामान्य वाचकाला एखाद्या अपरिचित कलाकृतीचें ह्या दोन प्रकारच्या समीक्षणांत परस्परविरोधी मूल्यमापन आढळतें. कलाकृतीचें समीक्षण करतांना लेखकाच्या भल्याबुऱ्या व्यक्तिमत्वाची, त्याच्या कलाकृतीशीं सांगड घालून त्यांत खाजगी हेवादाव्याच्या परतफेडीचा मालमसाला घालून कलाकृतीचें हीनरस भडकपणानें रंगवणें हें जसें गर्ह्य तसें लेखकाची कलाकृति दुय्यम दर्जाची असली तरीसुद्धां त्याचा कोप होईल ह्या भीतीनें त्याची खुशामत करण्यासाठीं ती निर्विवाद श्रेष्ठ आहे असें मांडणें हेंही पण अप्रामाणिकच. खरा समीक्षक हा असंतुष्ट आत्मा असतां कामा नये. पूर्वग्रहविरहित समतोल वृत्तीनें कलाकृतींचें परिक्षण करणें हें त्याचें खरें कर्तव्य आहे. व्यक्तिनिष्ठतेपेक्षां वस्तुनिष्ठतेवर भर देऊन कलाकृतीचें मूल्यमापन करणें त्याला शक्य झाले पाहिजे. चांगल्या समीक्षकाच्या ठायीं तीन गुण अपेक्षित असतात. कलाकृतीच्या निर्मितीशीं निगडीत असलेल्या लेखकाच्या मनोव्यापाराशीं तद्रूप होणें, प्रत्येक उत्कट अनुभव तत्संबंधित गौण व्यवहारापासून अलग करून त्याची रसवत्ता ओळखणें आणि मूल्यांचें परिपूर्ण ज्ञान आत्मसात करणें अशा ह्या तीन गुणांनीं युक्त असणारा समीक्षकच समतोल वृत्तीचा ठरतो. या उलट वाङ्मयसागरांत दडलेलीं रत्नें न हुडकतां तळचा गाळ चिवडून गढूळ जीवनाचें दर्शन घडवणारा समीक्षक व बुद्ध्याच वाचकांची दिशाभूल करण्यांत इतिकर्तव्य मानीत असतो.

गेल्या महिन्यांत मराठी भाषेंतील एक प्रभावी सिद्धहस्त लेखक श्री. पु. भा. भावे ह्यांचें नवीन नाटक 'पडछाया' प्रयोगरूपानें जनतेसमोर आलें, व त्या नाटकाचीं परिक्षणें बहुतेक सर्व मराठी नियतकालिकांत तत्काळ प्रसिद्ध झालीं. गेल्या वर्षांत भाव्यांनीं नवकाव्यावर जो हिरीरीनें हल्ला केला त्यावरून हें परतफेडीचें वाग तत्परतेनें पोंचवण्याचा उपक्रम होणार हें अपेक्षितच होतें. पण तें करतांना शिष्टसंमत मांगल्य विसरून चैत्रांतच फाल्गुन साजरा करण्याची वृत्ती कांहीं टीकाकारांची दिसली त्यावरून श्री. भावे ह्यांच्या प्रभावी लेखनाचा दुस्वास करणारे जंतु कसे निष्क्रीयपणें वळवळ करतात हें पाहून घृणाच आली.

कोणताहि लेखक हा जसा उपजतच श्रेष्ठ होत नसतो त्याप्रमाणें प्रत्येक श्रेष्ठ लेखकाची प्रत्येक कृतीही परिपूर्ण असूं शकत नाहीं. कांही लेखकांची भाषाशैली प्रभावी असते, तर कांहींचें कल्पनाचातुर्य वैशिष्ट्यपूर्ण असतें, कांहीं लेखक सतत भरघोस लिहूं शकतात, तर कांहीं अचानक चमकून आपलें वैशिष्ट्य दाखवतात. कांहीं लेखक नाविन्याच्या आहारीं जाण्याचा उपक्रम योजतात तर कांहीं जुन्यांतच सोनें असल्याचा अट्टाहास बाळगतात. व्यक्ति तितक्या प्रकृति हें खरें मानलें तर सुदर्शनानें पाण्यावर कुरघोडी करण्याचा यत्न करणें हास्यास्पद ठरेल. आणि म्हणूनच श्री. भावे ह्यांच्या एका कलाकृतीवरून त्यांची वाङ्मयीन महात्मता प्रस्थापित अगर उध्वस्त करणाऱ्या समीक्षकांचे प्रयत्न पाहिले तर सुबुद्ध वाचकाला हंसू आल्याशिवाय राहात नाहीं.

श्री. भावे ह्यांच्या 'पडछाया' नाटकाला कोणी सामर्थ्यवान म्हटलें







अनुक्रमणिका

आहे, कोणी स्फूर्तीदायक म्हटलें आहे, कोणी बीभत्स व रुचिहीन म्हटलें आहे तर कोणी निस्संकोचपणें गचाळ म्हटलें आहे. एकाच वाङ्मयकृतीला एवढी विविध संबोधनें लागलेलीं पाहून सामान्य वाचकाचा गोंधळ उडणें शक्य आहे. तशांत नाट्यवाङ्मयाच्या समीक्षणांत (जाहिरातीच्या लालचीनें) कांहीं नियतकालिकें फक्त प्रयोगाच्या स्तुतीवर भर देतात तर कांहीं प्रयोगाच्या दोषांचे खापर लेखकाच्या डोक्यावर फोडून स्पर्शजन्य परिणामापासून सावध राहाण्याचा सादरकर्त्याला इशारा देतात. 'पडछाया' हें नाटक ह्या सर्व प्रकारच्या परिक्षणांतून तावून सुलाखून उरलें आहे हेंच त्या नाटकाचें वैशिष्ट्य म्हणतां येईल. 'पडछाय' हें श्री. भावे यांचे तिसरे नाटक. विषकन्या व स्वामिनी ह्या त्यांच्या पहिल्या दोन नाटकाशीं कांहीं बाबतींत सारखें व कांहीं बाबतींत निराळें ठरणारें हें नाटक कलाकृति म्हणून सर्वगुणसंपन्न जरि नसलें तरी सामान्य खास नाहीं. केदारनाथ सुखात्मे या सधन व सुखलोलूप तरुणाच्या जीवनावर मृत्यूची पडछाया पडतांच त्याच्या जीवनांत कसा आमूलाग्र बदल होतो व पूर्वी त्यानें तुच्छ ठरवलेलीं माणसें त्याच्या कठिण प्रसंगी त्याला साथ करून, त्यानें जवळ केलेलीं माणसें मात्र त्याला कशी दुरावतात व अखेरीस डॉक्टरी तपासणींत झालेल्या गफ-लतीचा उलगडा होतांच त्याच्या जीवनांत पुन्हां आनंद कसा दरवळतो ह्या कथानकावर 'पडछाया' नाटकाची उभारणी झालेली आहे. अखे-रीस आनंदपर्यवसायी ठरणाऱ्या ह्या नाटकावर अधिक काल दुःखाचीच पडछाया पडलेली असल्यामुळें ह्या नाटकाला अधिकांश करूण नाटकाचे स्वरूप प्राप्त झालेलें आहे. आणि म्हणूनच आजकालच्या हलक्या फुलक्या अगर उथळ मानसव्यवहाराचे बीभत्स दिग्दर्शन घडवणाऱ्या नवनाट्याला सरावलेले प्रेक्षक अगर समीक्षक ह्या गंभीर कथानकानें बावरून गेल्यास नवल नाहीं. मृत्यूच्या समीप दर्शनानें माणसाला नवीन जीवनदृष्टी कशी प्राप्त होते ह्याचें दर्शन घडविणारें कथानक अतवर्य व पोकळ आहे अशी ओरड कांहीं समीक्षकांनीं केली ह्यांतच श्री. भाव्यांच्या सामर्थ्याचें यश आहे. प्रस्तुत नाटक स्वामिनीची पडछाया आहे असें विधान करणाऱ्या समीक्षकांचा मात्र कींव कराविशी वाटते आणि हें ठांसून सांगतांना स्वामिनीच्या सुसह्य आचरटपणापेक्षां पडछायेचें वातावरण अधिक बीभत्स रूचिहीनतेनें भरलेलें आहे असें विधान ते करतात तेव्हां त्यांच्या स्मरणशक्तीबरोबर त्यांच्या रसग्रहण-शक्तीचा लोप झाला कीं काय अशीहि शंका येते. मराठी रंगमंचावर साक्षात् मृत्यूचें सानिध्य इतक्या परिणामकारकतेनें घडवणारें हें एक सामर्थ्यवान नाटक आहे. आणि तें प्रगट करतांना श्री. भाव्यांनीं आपल्या लेखनशैलीचें सर्व सामर्थ्य खर्ची घालण्यांत कसूर केलेली नाहीं.

हें गंभीर आणि भव्य कथानक हाताळतांना भाव्यांनीं मोजकीच पात्रयोजना खर्ची घातली आहे. ह्या नाट्याचा नायक केदार हा शतसहस्रांचा धनी आहे व तदनुषंगानें त्याच्या ठायीं उपभोगवृत्ति, असहिष्णुता व उद्दामपणा हे दुर्गुण संभवतात हे निसर्गसिद्धच आहे.

हा कथानायक सामान्य ठेवण्यांत त्याची शोकांतिका नाट्यतत्त्वांच्या दृष्टीनें खालच्या पातळीची ठरली तरिसुद्धां केवळ काल्पनिक, अवास्तव व अशक्यप्राय उच्चत्वाच्या आहारीं न जातां सामान्य सघन माणसाची व्यक्तिरेखा उभी करणें श्री. भाव्यांना जास्त संमत आहे. भाव्यांच्या नाटकाचे नायक सधन असतात. त्यांच्या निकट कुटुंबियांचे पाश मृत्यूमुळें नष्ट झालेले असल्यामुळें त्यांचा 'पोरकेपणा' हें फक्त त्यांचें वैशिष्ट्य मानतां येईल. हे नायक उपभोगवृत्तीचे असतात आणि वाडवडिलांच्या पैशाच्या पाठबळावर आपले निष्क्रीय जीवन जगतात. स्वामिनीमधला जगन्नाथ आणि पडछायेमधला केदार ह्याच प्रकारचे आहेत पण विषकन्येमधला नीळकंठ मात्र आपल्या कर्तृत्वानें पुढें आलेला असल्यामुळें तो निराळा वाटतो. भाव्यांचे नायक प्रेमिक आहेत असें मानणें असंभाव्य होईल. ते मुखलोलुप आहेत आणि तरीहुद्धां त्या सर्वांचा लग्न संस्थेवर विश्वास आहे. ते वरवर जरी चैनी वाटले तरी किंचित् शाब्दिक चवचालपणा सोडल्यास त्यांच्या स्वभावाची बैठक समाज नीतिरूच अधिष्ठित झालेली असते. आपल्या श्रीमंतीमुळें आपल्या सभोंवती पिंगा घालणाऱ्या अनेक स्त्रियांपैकीं कुणातरी एकीची वधू म्हणून निवड करण्यासाठींच जणुं त्यांचे प्रयत्न चालू असतात. अर्थात् सुखलोलुप वृत्तीमुळें होणारें स्खलन हे अशा सघन तरुणांच्या बाबतींत स्वाभाविक असतें. हें गृहित धरून सुद्धां त्यांचे चित्रण करतांना भाव्यांनीं सुसंस्कृत जीवनाशीं त्यांना बद्ध करून थोडेसे जीर्णमतवादी बनवलें आहे. आजकालच्या तरुणांचें हें स्वभावचित्रण यथातथ्य असतांना सुद्धां अनेक समीक्षकांनीं भाव्यांच्या नायकांना अवास्तव म्हटलें आहे. विषकन्येमधला नीळकंठ जसा रेखीव वाटतो तितका स्वामिनीचा जगन्नाथ किंवा पडछायेचा केदार वाटत नाहीं ह्याचें कारण त्या त्या नाटकाचें कथानक असावें असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं. पण जगन्नाथापेक्षां केदारचें स्वभावचित्रण करतांना नीळकंठाचा भडकपणा सौम्य करून संवादाद्वारें अथवा त्याच्या स्वगतांनीं त्याच्या स्वभावाचे विशेष भाव्यांनीं यशस्वीपणें दाखविले आहेत.



भाव्यांच्या नायिका किंचित् साचेबंद पद्धतीच्या वाटतात. त्या एकतर थिल्लर, स्वैर, सुखासीन आणि चंचल असतात किंवा त्या स्थिर, त्यागी व पवित्र देवता तरी असतात. भाव्यांना मध्यमवर्ग संमत नाहीं. विषकन्येतील विषया, स्वामिनीमधल्या विभाशोभा आणि पडछायेमधली हेमा ह्या पहिल्या प्रकारच्या आहेत तर स्वामिनीमधली काशी आणि पडछायेंतली गौरी ह्या दुसऱ्या प्रकारच्या आहेत. आपल्या नाटकांतल्या पात्रांना स्वभावविशिष्ठ नांवें देऊन त्यांचे स्वभाव प्रथमताच स्पष्ट करणें हें भाव्यांचें एक आणखी वैशिष्ठ्य. त्यांच्या नायकांचीं नांवें जुनाट वाटतात पण तोच त्यांच्या स्वभावाचा स्थायिभाव आहे. नीळकंठ, जगन्नाथ, केदार ही नांवें भोळसटपणाची प्रतीकें मानलीं तर त्यांच्या नायिकांचीं विषया, विभा, शोभा, हेमा ही नांवें आधुनिक चंचल स्त्रीच्या स्वभावाशीं जुळतीं वाटतात. ह्या उलट काशी, गौरी, उमा ही पावित्र्यांची प्रतीकें ठरणारीं नांवेंही भाव्यांनीं त्या त्या प्रतींच्या नायिकांना देऊन त्यांचे स्थायी स्वभाव स्पष्ट केलेले आहेत. पडछायेंतील दिनानाथ ह्या अतीव कनवाळु स्वभाव असलेल्या पात्राला दिलेलें नांव तसेंच दिगंबर चिंतोपंत इत्यादि नावेंही त्या त्या वृत्तींच्या पात्रांना अनुरूप अशीं ठेवण्यांत भाव्यांची योजकता स्पष्ट दिसते. समीक्षकांनीं भाव्यांच्या स्वभावचित्रणाला नांवें ठेवतांना ह्या वैशिष्ठ्याची दखल घेतलेली नाहीं ह्यावरूनच त्या समीक्षणाचा उथळपणा स्पष्ट होतो.

भाव्यांच्या नायकांचे संवाद हे आधुनिक नाट्यपद्धतीला जुळणारे नसल्यामुळें त्यांच्यावर याबाबत टीकेची झोड उठलेली आहे. भाव्यांच्या नाटकांत व्याख्यानबाजी फार आहे अशीही अनेकांची तक्रार आहे. तसेंच स्वगताचा उपयोग भाव्यांनीं फार केलेला असल्यामुळें त्यांचे संवाद अवास्तव म्हणून ठरवलेले आहेत. स्वामिनी नाटकाच्या प्रस्तावनेंत भाव्यांनीं ह्याबाबतची आपली भूमिका स्पष्ट केलेली आहे. नाट्योत्कर्षास आवश्यक असेल त्या ठिकाणीं स्वगतें व प्रदीर्घ संवाद यांवर भाव्यांनीं भर दिलेला आहे. पुष्कळदां भाव्यांच्या नाटकांत भाव्यांच्या वक्तृत्वाचे विशेष प्रकर्षानें आढळतात. एखादें तत्व किंवा एखादा मुद्दा ठसवण्यासाठीं आपल्या वक्तृत्वांत जशी वैचित्र्यपूर्ण पुनरोक्ति ते करतात तिचाच उपयोग भावे आपल्या पात्राद्वारें नाटकांत करतांना आढळतात. भाव्यांचीं नाटकें तंत्राच्या बाबतींत जुनाट वाटलीं तरी ती घटकाभर मनोरंजन करणाऱ्या नवनाट्यापेक्षां जास्त परिणामकारक वाटतात. केवळ कलेसाठीं कला हा भाव्यांच्या लेखनाचा स्थायीभाव नसल्यामुळें ती मतप्रणाली पुरस्कृत करणारे समीक्षक त्यांच्या लेखनाला नावें ठेवतात. भाव्यांचे लेखन बालिश, पोंचट, अवास्तव व त्यांचें तत्वज्ञान शिळेंपाकें आहे इथपर्यंत ओरडून सांगण्यांत टीकाकारांची मजल गेलेली आहे. जें नव आहे तें अशाश्वत आहे, उथळ आहे, तकलादू आहे असें मानणें जसें कांहींसें अवास्तव वाटतें तसेंच जुनें ते टाकाऊ, अयथार्थ व बाष्कळ मानणें हेही अन्यायकारक आहे. भाव्यांनीं आपल्या नाटकांद्वारें कांहीं समस्या समाजासमोर मांडल्या आहेत आणि त्यांच्या विशिष्ट मनोभूमिकेवरून त्या सोडवण्याचा त्यांनीं प्रामाणिक प्रयत्न केला आहे. स्त्रीपुरुषसंबंध, विवाहविच्छेद, इत्यादि आधुनिक मानवी समाजाच्या समस्या किंवा मांगल्य, त्याग निरागसवृत्ति ह्यासारखे मानवी स्वभावांचे चिरंतन स्थायीभाव ह्यांचें दिग्दर्शन आपल्या लेखनांत करणें हेंच भाव्यांचें ब्रीद ठरल्यागत वाटतें. स्वभाव परिपोषासाठीं भाव्यांनीं










नवनाट्याच्या कृत्रिम तंत्राचा अवलंब न करतां स्पष्ट शब्दांनीं आपल्या संवादांत परिणामकारकतेनें त्या प्रगट केल्या आहेत. आणि यामुळेंच त्यांचे संवाद जास्त स्वाभाविक ठरतात. कांहीं आधुनिक टीकाकारांना भाव्यांचे संवाद मानवी संभाषणाशीं साधर्म्य नसणारे वाटतात. विचारे भावे! नवनाट्यांतले सूचक वा संदिग्ध संवाद पद्धतीचें तंत्र अजून त्यांना हाताळतां येऊं नये व ह्यांतच त्यांच्या अनैसर्गिक संवादपद्धतीचें अपयश आहे हें त्यांना आकलन होऊं नये अं! आजचे प्रेक्षक सुबुद्ध आहेत, त्यांना कूटप्रश्न आवडतात, मानसिक व्यवहारांची तरलता, रूढ नीतिनियमांचे उल्लंघन करून पुरोगामित्वाची विरुद्धें मिरवणारीं पात्रें त्यांना आकर्षित करतात, संवादांत स्पष्ट मतप्रदर्शनापेक्षां संदिग्ध संज्ञाप्रवाहाचें तंत्र त्यांना अधिक हेलावतें, ढोबळ वास्तववादी नेपथ्यरचनेपेक्षां तिरकस प्रकाशयोजना आणि सूचक रंगमंचाची सिद्धी त्यांना मानवते. इत्यादि नवनाट्याच्या मूलभूत अंगांवर आतांपर्यंत कितीतरी लिखाण वा दिग्दर्शन मराठी नाट्यसृष्टीच्या ज्ञानेश्वरांनीं केलेलें आहे. तें भाव्यांनीं वाचलेलें दिसत नाहीं. पुदोवकिन् काय म्हणतो, आयझेनस्टाइन् काय लिहितो, क्रोनेनबर्जरचें काय मत आहे, सेस्सू हायाकावाच्या अभिनयाचें वैशिष्ट्य कोणतें, बोरीस आरॉन्सनचें नेपथ्य बोलकें कां वाटतें, कारीन्स्काची वेषभूषा चमत्कृतिपूर्ण कशी असते, मार्गेरित मोनोची पार्श्वसंगीतयोजना शर्करामधुर कां लागते इत्यादि आधुनिक नाट्यदर्शनाचे धडे पुरोगामी साप्ताहिकांतून दिले जात असतां त्याचा अभ्यास न करतां भाव्यांनी आपल्या नाट्यकृतीला जुनेरानीं अद्याप सजवावें हें त्यांच्या पुरातन वृत्तीला शोभण्यासारखेंच आहे. आणि म्हणूनच भाव्यांचीं नाटकें अपारदर्शी वाटतात. असो. भाव्यांचे दोष दाखवल्यानंतर त्यांच्या गुणाकडे वळणें जरूर आहे.

भाव्यांच्या संवादांत पुष्कळदां संगीतिकेप्रमाणें काव्याचा फुलोरा फुललेला दिसतो. पडछायेमध्यें भाव्यांची काव्यमय कल्पनाशक्ति त्या त्या प्रसंगीं विद्युल्लतेच्या तडफेनें चमकतांना आढळते. पहिल्या अंकांतील व तिसऱ्या अंकांतला गौरी केदार संवाद, तिसऱ्या अंकांतील गौरी दिनानाथाचा संवाद, पहिल्या अंकांत कॅन्सरची चाहुल कळतांच केदारच्या वाणींतून स्फुरलेलें आर्त काव्य ही पडछायेची लेणीं होत. एका टीकाकाराला केदारचें हें आर्त स्वगत भंपक काव्य वाटतें. कॅन्सर झालेला केदार अशा तऱ्हेनें काव्यांत बोलतो हें त्याला अस्वाभाविक वाटते. वास्तविक भाव्यांना कॅन्सरचा अनुभव नसतांना केदारची ही काव्यवाणी तब्बल दोन पाने भरून दुथडी वाहूं देणं अवास्तवच ठरतं. कॅन्सर झालेल्या नायकानें थिल्लरपणें काव्यांत न बोलतां कोचावर मान टाकून मुग्धपणें कुढणें नाट्यपूर्ण दिसलें असतें. आपल्या स्नानगृहांतून 'युरेका! 'युरेका!' म्हणून विवस्त्र स्थितींत ओरडत येणारा आर्किमिडीस आधुनिक वास्तववादी समीक्षकाला जसा अवास्तव व पोरकट वाटेल तसाच हा कॅन्सरनें घेरलेला केदारहि काव्य बोलूं लागेल हेंही त्याला अवास्तवच वाटेल.

पडछायेंतला भाव्यांचा वाग्विलास त्यांच्या प्रभावी लेखनशैलीचें विविध दर्शन इतकें परिपूर्णतेनें घडवतो कीं नाटक वाचणारा वाचक व ऐकणारा श्रोता सहज भारावून जावा. नश्वर जीवन आणि शाश्वत मूल्यें ह्यांच्या संघर्षाचे पडसाद वेगवेगळ्या प्रसंगीं आणि निरनिराळ्या पात्रांद्वारें परिणामकारक रीतीनें भाव्यांनीं उमटवले आहेत. जीवनमृत्यूच्या झगड्याची सबंध नाटकावर पडलेली पडछाया व तिच्या परिसरांत वावरणारीं पात्रें एका धीरगंभीर पातळीवर ठेवण्याचें बिकट कार्य भाव्यांच्या नाट्यलेखनाचें कौशल्य सिद्ध करतें. पहिल्या अंकांत केदारवर अचानक आलेल्या सांवटामुळें पसरलेलें गंभीर वातावरण चिंतोपंत, दत्तू व दिगंबर यांच्या दुसऱ्या अंकांतल्या प्रवेशानें निवळतें न निवळतें तोंच हेमानें केलेली केदारची निर्भर्त्सना पुन्हां एकदां रंगभूमीवर मृत्यूची पडछाया पसरवूं लागते तोंच होणारा गौरीचा प्रवेश—तिचें मांगल्यपूर्ण व्यक्तिमत्त्व व वीरोदात्त स्वभाव—ह्यामुळें केदारला जो एक खंबीर आधार प्राप्त होतो, त्यामुळें केदार व प्रेक्षक मृत्यूच्या वातावरणांतून निभावतात.

योगायोगावरच नाट्य आधारलेलें असतें, असंभाव्य कधीं कधीं संभाव्य ठरूं शकतें, कृत्रिमतेंतहीं अनेकदां सत्याचे अंकुर उगवूं शकतात इत्यादि जीवनाचीं व तदनुषंगिक नाट्याची मूल्यें न मानणारा समीक्षक पडछायेसारख्या उत्कृष्ट नाट्यकृतीची आपल्या पूर्वग्रहदूषित मनोवृत्तीनें जेव्हां चिरफाड करूं लागतो तेव्हां त्याच्या प्रत्येक घावाबरोबर कलाकृतीच्या चिंधड्या न होतां उलट कलाकृतीच्या प्रत्येक अवशेषाला निराळेंच कलापूर्ण स्वरूप प्राप्त होत असतें. सामर्थ्यवान कलावंत अशा क्षुद्र व छुप्या हल्ल्यांनीं घायाळ न होतां उलट धीरगंभीर योद्ध्याप्रमाणें ते घाव हांसतहांसत झेलत स्थिर उभा राहातो. श्री. भावे ह्यांच्यावर झालेल्या कुत्सित टीकेनें त्यांनीं समतोल वृत्ती सोडली नाहीं अथवा हल्ला परतविण्याचा प्रयत्न केला नाहीं ह्यांतच भावे यांच्या सुसंस्कृत मनोवृत्तीचा मोठेपणा दिसून येतो. ज्यांना चिरडायला नख पुरे त्यांच्यासाठीं घण उचलणे जसें आवश्यक नाहीं तसें योग्यही नाहीं. अशा जंतूंना अनुल्लेखानें मरूं देणं ह्यांतच सामर्थ्यवान व सहिष्णु मानवाचा मोठेपणा आहे. भाव्यांची सामर्थ्यवान प्रतिभा त्यापेक्षां विधायक कलाकृतीसाठीं खर्च व्हावी व तिच्या तळपत्या ज्योतीनें मराठी वाङ्मयाला अधिकाधिक प्रकाश द्यावा हीच त्यांच्या चहात्यांची नम्र अपेक्षा आहे. • • •











( पान १० वरून चालू )

यचंय." त्यांचा प्रश्नांकित चेहरा पाहून मी म्हटलं, "त्यांना आपलीं पुस्तकं—सह्याद्रि वगैरे भेट द्यायचीं आहेत." त्यावर यशवंतराव मनमोकळेपणानें हंसले, आणि म्हणाले—"सामंत—जोगळेकरांना सांगा—आम्ही तुमचं सह्याद्रि हें पुस्तक वाचलंय. नुसतं नव्हे, तर विकत घेऊन वाचलंय. आणि त्यांना सांगा मला फार फार आवडलंय तें."

यशवंतरावांची रसिक आणि कलालोलुप वृत्ति त्यांच्या राजकीय व्यक्तिमत्वाला एखाद्या झालरीसारखी शोभून दिसते. त्यांचं भाषण तुम्ही ऐकावं. कृष्णाकांठची सारींच माणसं फार सुरेख मराठी बोलतात. राघूअण्णा लिमये, बाळासाहेब देसाई,—पण या दोघांपेक्षां यशवंतरावांच्या वक्तृत्वाची खुमारी न्यारीच. बोलतांना ते भावविवश होत नाहींत पण श्रोत्यांच्या काळजाचा ठाव घेतात. कऱ्हाडच्या पॉली टेक्नीकचं उद्घाटन करतांना त्यांना कृष्णा कोयनेच्या संगमावरचें काव्यमय भाष्य सुचतें; तर बंडगार्डनवर फुलांच्या प्रदर्शनाचें उद्घाटन करतांना फुलें आणि राजकारणी पुरुष यांचा समन्वय साधण्यासाठीं त्यांची कवित्वशक्ति धडपडते. कोंकणच्या लोकांचें आभार मानतांना कोंकणांतील नद्यांच्या काव्यमय नांवावर ते बेहद्द खूष होतात तर कोंकणच्या रम्य निसर्गापेक्षां कोंकणची सर्वात थोर देणगी म्हणजे कोंकणचा माणूस असं वर्णन करून ते तेथें जमलेल्या हजारों कोंकणवासीयांच्या हृदयाच्या तारा अलगद छेडतात. पुरवठा मंत्री असतांना यशवंतरावांचीं भाषणें म्हणजे एक गंमत असे. मध्यमवर्गीय कुटुंबियांच्या तांदळांतील खड्यावरचें त्यांचं भाष्य पत्रकारांना चौकटींत टाकण्याचा मोह होई.

यशवन्तराव पत्रकारांना फार मानतात. वर्तमानपत्रांची महति ते जाणून आहेत. महाराष्ट्रांतील प्रमुख दैनिकांतील महत्त्वाचा मजकूर ते डोळ्यांखालून घालतात. असेंब्ली चालू असो अगर आपला दौरा असो, या प्रसंगीं कितीहि घाई आणि गर्दी असो, ते पत्रकारांची प्रथम चौकशी करतील. त्यांची कुठें गैरसोय झालेली नाहींना याकडे लक्ष देतील. त्यांच्या वाहनाची व्यवस्था करतील. पुण्या-मुंबईचे अनेक पत्रप्रतिभावंत यशवंतरावांच्या दोस्त मंडळींत जमा होतात. खेड्यांतील दौऱ्यांत तर या पत्रकारांना आपल्या समवेत जेवायला घेतल्याशिवाय त्यांना चैन नाहीं पडत.

यशवंतराव निश्चयी आणि करारी आहेत. अन्याय दूर करतील, पण अन्यायी गोष्ट करणार नाहींत. मागे त्यांच्याकडे अॅकोमोडेशन खातें होतें. मुंबईत जागेचा प्रश्न बिकट होता. तेव्हां एक केस घेऊन पुण्याचे एक आमदार त्यांच्यापाशीं गेले. पण यशवंतरावांनी स्पष्ट नकार दिला. हें माझ्या हातून होणार नाहीं. यामुळें यशवंतरावांच्याबद्दल त्यांच्या मित्रांच्याहि मनांत भारी वचक आहे.

ही कणखर वृत्ति आणि नेकजातपणा त्यांनी आपल्या राजकीय जीवनांत राखला आहे. त्यांनी आपल्या मतांशीं कधींच प्रतारणा केली नाहीं. पुढचें भविष्य जाणलें आणि भविष्याला आकारहि दिला.

लोकमान्यानंतर महाराष्ट्राला पुढारी नव्हता. आज यशवंतरावांच्या खऱ्या कर्तृत्वाला नवमहाराष्ट्राच्या जन्मदिनीं खरोखरी सुरवात होत आहे. न जाणो कुणी सांगावं रत्नागिरीला चिकटून असलेल्या सातारा जिल्ह्यांतील हा थोर नेता कदाचित् लोकमान्यांची रिकामी गादी चालवीलहि.

कारण आज तरी यशवंतराव म्हणजे पडत्या काळांतील मराठी कर्तृत्वाचें यशवंत प्रतीक!

बाळ सामंत



( पान १७ वरून चालू )

**जिज्ञासू :** कोणी लिहिलं ? गागाभट्टांनी ?

**गुरुजी :** गागाभट्ट तर आहेतच, पण त्याशिवाय परमानंद कवीन्द्र जयराम पिंडये हे शिवाजीला पाहिलेले व शिवाजीच्या वेळचे प्रसिद्ध कवि यांनी लिहिलेलीं संस्कृत काव्यें सांपडली आहेत. पैकीं जयराम कवि तर असें म्हणतो, "मया द्वादशभाषाभिः कविकर्म विरच्यते."

**जिज्ञासू :** काय बारा भाषांत रचना केली ?

**गुरुजी :** हो. ऐका. द्वादशभाषासु संस्कृत प्राकृत गोपावलीय गुर्जर बखर दुढार पंजाब हिंदुस्थान बगुल यावनी दक्षिणात्य यावनी कार्णाटकाख्यासु निरर्गलं ब्रवयामि इति बारा भाषांतील यांचे कांहीं नमुनेहि सांपडले आहेत. मराठीतील एक ऐका.

रिकेचा धणी लेक ज्याचा शिवाजी
करि तो बहु पातशाहासी वाजी
तयाला रणामाजी हे एक माने
अरि जओ गला घालुनी कमानें

कमाने म्हणजे तिरुमले राधा माधव विलास चम्पु पर्णालपर्वत ग्रहणाख्यान ही जयरामाची काव्यें प्रसिद्ध आहेत. पुरुषोत्तोम बदेष्टि याने केलेले शिव-काव्य छापलें आहे. पण हा कवी—पेशवाईच्या अखेरच्या काळांतील आहे. शेवटी तुम्हाला शिवाजीच्याबरोबर विश्वासू म्हणून नेलेला नेवाशाचा राहणारा परमानन्द कवी याची ओळख करून देतो. याने आपल्या ग्रंथांत—चरितं शिवराजस्य भरतस्येव भारतम्. असें त्यानें म्हटलें आहे. म्हणून हा ग्रंथ शिवभारत या नांवानें प्रसिद्ध आहे. यांत कार्य तर आहेच पण पुष्कळच नवी माहिती दिलेली आहे. हा पुढें परमानन्द गोसावी पोलादपूरकर साधू म्हणून प्रसिद्ध झाला. हा शिवभारत ग्रंथ सोप्या आणि मनोहर शैलीने लिहिला आहे. कवीची माहितगारी विष्णुचा अवतार म्हणतो. बखरकाराप्रमाणें शंकराचा अवतार म्हणत नाहीं. यांतील शिवाजीच्या वर्णनाचे मार्मिक श्लोक पहा.

मनस्वी सुप्रसन्नात्मा प्रतापी विजितेन्द्रियः
भीमादपि महाभीमः सीमा सर्वधनुर्भृताम्
धीमान उदारचरितः श्रीमानद्भुतविक्रमः
कृती कृतज्ञः सुकृती कृतात्मा कृतलक्षणः
वक्ता वाक्यस्य सत्यस्य श्रोता चाठि —विचक्षणः
देवद्विजगवां गोप्ता दुर्दैन्तर्यवनान्तकः
प्रपन्नानां परित्राता प्रजानां प्रियकारकः

अशा शिवाजीमहाराजांची अगदीं लहानपणीं केलेली मुद्रा त्याच्या भावी चरित्राचे चित्र दाखविणारी असल्यास नवल काय ? मुद्रेच्या कोंपऱ्यांतील चन्द्रसूर्य दाखवितात, कीं मुद्रा यावच्चन्द्रदिवाकरौ राहील. मुद्रेचा श्लोक असा :

प्रतिपश्चन्द्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववन्दिता.
शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते

ह्या मुद्रेंत वर्णिल्याप्रमाणें आपल्या महाराष्ट्राचे यश चंद्राप्रमाणें वाढते असो आणि त्यानें लोकांचें भद्र म्हणजे कल्याण साधो.









● ललितकला अकादमी ● नभोवाणी आणि प्रा. गाडगीळ

● मराठी पुस्तकांना पारितोषिकें ● सरकारी ज्ञानेश्वरी.

## सत्यं. शिवं. सुंदरम्

### ललितकला अकादमी

ललितकला अकादमी म्हणजे भारताची प्रातिनिधिक राष्ट्रीय अकादमी. या संस्थेद्वारां भारतीय चित्रकलेची प्रगति आणि प्रचार करण्याचे आमचे ध्येय आहे. पण आजपावेतों संस्थेनें केलेलें कार्य लक्षांत घेतां पाश्चिमात्यांचें भ्रष्ट अनुकरण अगर राष्ट्रीयत्वाच्या नांवाखालीं निर्जीव कष्टात्मक आविष्कार यापेक्षां अकादमीचें कार्य फारसे उल्लेखनीय नाहीं. स्वतंत्र राष्ट्राची अस्मिता अकादमींत अभावानेंच जाणवते. विशेषत: गेल्या पन्नास वर्षांच्या भारतीय चित्रकलेच्या इतिहासांत पाश्चिमात्य प्रभावाविरुद्ध बंगाली चित्रकारांनी डॉ. हॅवेल यांच्या मार्गदर्शनाखाली आणि डॉ. अवनींद्रनाथाच्या नेतृत्वाखाली केलेलें बंड म्हणजे भारतीय चित्रकलेच्या इतिहासांतील एक रंगदार पान. अमृता शेरगिल अवनींद्रनाथ रवींद्रनाथ आणि जेमिनी रॉय या भिन्न भिन्न प्रकृतीच्या वैशिष्टयपूर्ण प्रवाहांचे दर्शन आजच्या भारतीय चित्रकलेंत फारसे आढळत नाहीं. अवनींद्रनाथांनीं अजंठाचें भव्य स्वप्न आपल्या कलमाच्या साह्यानें प्रत्यक्षांत निर्माण केलें. शेरगीलनें जॉगिन पचवला आणि एक अंर्तभेदी कुलम निर्माण केलें. जेमिनी रॉयचें विश्व तर लोककलेंतून आविष्कृत झालेले पण त्यावर पिकासोची छाया पडलेली पण इतकं असूनहि या थोर कलावंतांनीं आपलें स्वयंपूर्ण आणि स्वयंप्रकाशी कलाविश्व निर्माण केलें. पाश्चिमात्य चित्रकलेचा प्रभावच इतका जोरदार होता कीं त्यांत लुंगेसुंगे वाहून गेले पण या झंझावाताला दाद न देतां स्वतःचे वैशिष्टयपूर्ण व्यक्तिमत्व अभंग ठेवण्याचें कार्य या महान् कलाकारांनीं केलें. यांच्या पावलाचा मागोवा घेऊन हुसेन, गायतोंडे, रामकुमार मोहन सामंत, हेब्बर, पदमसी इत्यादि अनेक चित्रकारांनी आपली कला अविचल राखली.

ललितकला अकादमीतर्फे भरणारीं प्रदर्शनें खऱ्या अर्थानें राष्ट्रीय व्हायचीं असतील तर अशा सर्व थरांतील चित्रकारांच्या कलाकृति जमवून त्यांचें प्रदर्शन मांडलें तरच त्यांत भारतीय अंश प्रगटेल. ललितकला अकादमीचें भ्रष्ट अनुकरण आर्ट सोसायटी ऑफ इंडिया करीत आहे कीं काय अशी शंका परवां जहांगीर आर्ट गॅलरींतील सोसायटीतर्फे भरविण्यांत आलेलें सुमार प्रदर्शन पाहून आली. त्यांत राष्ट्रीय वळणाचा सर्वस्वी अभाव होता पण भारतीयत्व नाहीं तर निदान आधुनिकता तरी दिसेल या आशेनें पहाणाऱ्या रसिकांची निराशा होते. 'मॉडर्न' चित्रकलेचा ध्यास घेऊन निर्मिती करणारे चित्रकार बरेच असतात. पण त्यांच्या कलमाचें व्यक्तिमत्वाचें, प्रगटीकरणाचें आणि अनुभूतीचें विश्वच अंतर्बाह्य आधुनिक असल्याशिवाय आधुनिकतेच्या नांवाखालीं रेखाटली गेलेलीं चित्रें हास्यास्पद आणि अचेतन ठरतात. या प्रदर्शनांत लॅंडस्केप आणि पोर्ट्रेटचा दुष्काळ पाहून खेद वाटला भारतीय चित्रकारांना वास्तविक विषयाचें दारिद्र्य नाहीं आणि त्यांनीं थोडा व्यापक दृष्टिकोन बाळगला तर आमची चित्रकला साचेबंद आणि एकसुरी होणार नाहीं.

अकादमीचें कार्य व्यापक होण्यासाठीं आज अकादमींत राजकारणें खेळून मानाच्या जागा अडवून बसलेल्या श्रेष्ठींनी आतां निवृत्त होण्याची वेळ आली आहे. अकादमीनें आतां आपल्या निवड समितींतहि योग्य तो बदल केला पाहिजे. मोठमोठ्या शहरांत म्युझियमस् आणि आर्ट ग्यालरी उघडण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. चित्रकारांना स्वस्त साधनसामुग्री मिळवून देण्याची खटपट केली पाहिजे. आज सरकारनें उत्तम कलाकृति विकत घेण्यासाठीं एक नॅशनल पर्चेस कमिटी नेमली आहे. या समितीनें निरनिराळीं वैयक्तिक आणि सांघिक चित्रकला प्रदर्शनें बारकाईनें पाहून त्यांतील उत्तमोत्तम कलाकृति निवडल्या पाहिजेत. देशांत कित्येक हौशी रसिकांकडे उत्तम कलात्मक नमूने वंशपरंपरेनें अगर इतर कारणांनीं आलेले आहेत. तें मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

मात्र आज यापैकीं एकहि कार्य अकादमीच्या हातून होत नाहीं. होतें तें मात्र राजकारण आणि निकृष्ट कलाकृतींची निवड.

—गोपालन्

## साहित्य

### नभोवाणी आणि प्रा. गाडगीळ

मराठींतील नवकथाकार प्रा. गंगाधर गाडगीळांनीं गेल्या महिन्यांत नभोवाणी केंद्राविरुद्ध एक आघाडी उघडली आहे. गाडगीळांची एक सामान्य नाटिका नभोवाणीनें परत केली म्हणून गाडगीळ खवळले आणि त्यांनीं आपल्या बैठकींतील मासिकांत "एक निःसत्व संघटना" या मथळ्याखालीं नभोवाणीच्या अधिकाऱ्यांची कुवत, तेथील वातावरण, तेथील कार्यपद्धति, यांत्रिक साधनांचें दारिद्र्य आणि






अनुक्रमणिका

त्या संघटनेचें संकुचित धोरण या विषयावर सांगोपांग मतें व्यक्त केली आहेत. वास्तविक पाहातां गाडगीळ हे एकेकाळचे रेडियोचे नोकर. इच्छा नसतांना त्यांना नाइलाजानें रेडियो सोडावा लागला हा जुना इतिहास आहे. त्यांनीं रेडियो सोडला तरी रेडियोवरील लिखाण सोडले नाहीं. जुन्या काळांत गाडगीळांच्या अनेक 'इनोदी' श्रुतिका रेडियोनें श्रोत्यांच्या कानीं मारल्या आहेत. पण या वेळेस रेडियोच्या अधिकाऱ्यांनी अधिक समंजसपणा दाखवून गाडगीळांची एक श्रुतिका परत केली यामुळें गाडगीळ फार खवळले आहेत. गाडगीळ हे जितके उत्तम कथाकार आहेत तितकेच सामान्य नाटककार आहेत. पण रेडियोनें अश्लीलतेचा शिक्का मारून गाडगीळांची ही श्रुतिका परत केली याबद्दल रेडियोचे अधिकारी दोषास अवश्य पात्र आहेत. त्यांनी अधिक धैर्य दाखवून गाडगीळांची श्रुतिका सामान्य वाटते या शेऱ्यासकट परत करावयास हवी होती.

उत्तान, क्रूर अगर अनैतिक वर्तणुकीचें चित्रण साहित्यांत अगर टेलिव्हिजनवर झाल्यामुळें माणसांतील मनोविकृति किंवा गुन्हे करण्याची प्रवृत्ति यांत वाढ होत नसल्यामुळें असल्या 'आक्षेपार्ह' साहित्यावर रेडियोंत बंदी करण्यांत कांहींच अर्थ नाहीं अशी भूमिका गाडगीळांनीं मांडली आहे. गाडगीळांचें हें विधान कदाचित पाश्चिमात्य जीवनाचा विचार केल्यास तेथील रेडियोला अगर टेलिव्हिजन अधिकाऱ्यांना मानवण्यासारखें आहे. परंतु भारतासारख्या ज्या देशांत रेडियोसारख्या माध्यमाचा उपयोग प्रामुख्यानें लोकशिक्षणासाठीं होतो, आणि जेथील सर्वसामान्य जनतेचीं मनें असलें आक्षेपार्ह साहित्य मुकाट पचविण्यास अजून तरी समर्थ झालेली नाहीं. तेथें असलें आक्षेपार्ह साहित्य एक कौटुंबिक करमणुकीनें निरागस साधन म्हणून लोकप्रिय असलेल्या रेडियोला आणि त्याच्या श्रोत्यांना मानवण्यासारखें नाहीं हें सत्य आहे.

### मराठी पुस्तकांना पारितोषिकें

मराठी ग्रंथांना वार्षिक पारितोषिकें देण्याची सरकारी प्रथा आतां जुनी झाल्यामुळें त्याबाबतच्या निर्णयासंबंधींचा जनतेचा आणि साहित्यिकांचा उत्साह आतां किंचित् मंदावला आहे. शिवाय सरकारी चाकोरीतून चालणाऱ्या कामांत एकप्रकारचा सांचेबंदपणा येतो आणि तसलाच सांचेबंदपणा या पारितोषिकांच्या बाबतींत गेलीं कांहीं वर्षे घडल्यामुळें तत्संबंधीं वाचकांचें औत्सुक्य ओसरलें हें निर्विवाद.

याची जाणीव झाल्यामुळें यंदा या पारितोषिकांच्या यादींत कांहीं नवी नांवें आणि नवे विषय आढळतात आणि याबद्दल सरकारी समितीचें मनःपूर्वक अभिनंदन. श्री. आर्. एन्. वेलिंगकर यांचा 'ज्ञानेश्वरीचे शब्दभांडार' हा संशोधनात्मक ग्रंथ, प्राचार्य गो. रा. परांजपे यांचा अणुशक्ति हा शास्त्रीय ग्रंथ, रा. चिं. ढेरे यांची श्री नृसिंह सरस्वती आणि श्रीगुरु गोरखनाथ, श्री. ब. मो. पुरंदरे यांचे शिवचरित्र, श्री. ग. ह. खरे यांचे महाराष्ट्राचीं चार दैवतें, आण्णाभाऊ साठे यांचा फकिरा, कार्लेकर यांचें सर्कशीच्या रिंगणांत, या पुस्तकांचा आणि त्यांच्या लेखकांचा या ठिकाणीं निर्देश केला पाहिजे. या लेखकांना पारितोषिकें देऊन समितीनें थोडी व्यापक आणि जागरुकदृष्टि दाखवली याबद्दल समितीस धन्यवाद.

हे आणि इतर सर्व लेखक मंडळींचे दीपावलीतर्फे अभिनंदन.

### सरकारी ज्ञानेश्वरी

मुंबई सरकारनें ज्ञानेश्वरीची स्वस्त संशोधित आवृत्ति नुकतीच प्रसिद्ध करून एक सत्कार्य केलें आहे. सरकारचें जुनें वाङ्मय अल्प किंमतींत वाचकांना उपलब्ध करून देण्याचें धोरण अत्यंत प्रशंसनीय आहे. सरकारनें आतां नामदेवाच्या गाथ्याच्या संशोधनासाठीं एक समिति नेमली असून लवकरच नामदेवाचा गाथा प्रकाशित केला जाणार आहे. याचप्रमाणें दासबोध, एकनाथी भागवत, मोरोपंतांचीं काव्यें, शाहिरी काव्यें इत्यादि जुनें गीतभांडार आतां महाराष्ट्र सरकारनें छापण्याची योजना जाहीर करावी अशी विनंती आहे.

—पिनाकि



### कै. श्री. गजाननराव पाठक

मे. बा. ल. पाठक या प्रकाशन संस्थेचे व जगदीश्वर प्रेसचे मालक द. वि. ऊर्फ भाऊसाहेब पाठक यांचे वडील बंधू श्री. गजाननराव हे ता. २५।३।६० रोजीं सकाळीं भाटिया जनरल हॉस्पिटलमध्यें निधन पावले हे कळविण्यास वाईट वाटतें. निधनसमयीं त्यांचें वय ५८ होतें. गेले ७।८ महिने ते आजारी होते. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखांत आम्ही सहभागी आहोंत. परमेश्वर त्यांच्या आत्म्यास सद्गती देवो !








बहुमूल्य 'संदर्भग्रंथ'

—श्री. ग्र. पंडित

१९५८ सालीं मुंबईराज्य प्रथम पारितोषिक, १९५९ सालीं साहित्य अकादेमीचा प्रथम पुरस्कार पावलेला ग्रंथ.

बहुमूल्य 'संदर्भग्रंथ'

## भारतीय साहित्य शास्त्र

(लेखक—डॉ. ग. त्र्यं. देशपांडे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ७. किं. रु. १२-५० )

भारतीय साहित्यशास्त्राला हजारों वर्षांचा इतिहास आहे. इ. स. पूर्व-कालापासून तो इ. स. १७ व्या शतकापर्यंत त्याच्या विविध अंगांचा विकास होत आला. मोठमोठ्या आलंकारिकांनीं ग्रंथ लिहून साहित्यशास्त्रीय विचारांत शतकानुशतकें भर घातली. या साहित्यशास्त्रानें त्या त्या काळांत विद्वानांचें लक्ष वेधून घेतलें व आजपर्यंत त्याला अभ्यासकांची कधींच वाण पडली नाहीं. आजही या शास्त्राचे मोठे अभ्यासक शास्त्र विवरणपर ग्रंथ निर्माण करीत आहेत. कांहींनीं या शास्त्राचा इतिहास लिहिला आहे. 'भारतीय साहित्यशास्त्र' हा आजच्या काळांतील या शास्त्रावरचा फार महत्त्वाचा ग्रंथ आहे. या ग्रंथाच्या पूर्वार्धांत डॉ. ग. त्र्यं. देशपांडे यांनीं 'साहित्यशास्त्राचा विकास इतिहास-रुपानें दाखविला' आहे. उत्तरार्धांत साहित्य शास्त्रांतील सिद्धान्तांचें विवरण आहे.

साहित्यशास्त्राचा इतिहास अथवा टीका लिहितांना विद्वानांनी त्याच्या विकासाचा अभ्यास केला. हा विकास होत असतांना कांहीं 'संप्रदाय' (schools) तयार झाले व आपापल्या संप्रदायाच्या आधारासाठीं शास्त्रीय ग्रंथ निर्माण झाले असा तर्क त्यांनी मांडला व तो पुष्कळअंशीं मान्य झाला. अलंकार, वक्रोक्ति, रीति, ध्वनि व रस असे पांच संप्रदाय रूढ म्हणून मानण्यांत आले. प्रा. देशपांडे यांनीं अगदीं वेगळ्या दृष्टीनें या विकासाकडे पाहिलें. त्यांना विचाराअंती असें स्पष्ट दिसले कीं ह्या विकासांत त्या त्या काळांतील काव्याची आत्मभूत कल्पनांची एक अखंड उत्क्रांति होत आली आहे. अशी ही अभिजात उपपत्ति अजून कोणीही लावली नव्हती व यांतच या ग्रंथाच्या थोरवीचें मर्म सांपडतें.

या उपपत्तीची कल्पना थोडक्यांत अशी देता येईल. अगदीं सुरवातीला काव्यांगांचें विवेचन करणाऱ्या ग्रंथांना 'अलंकार ग्रंथ' म्हणत. अजूनहि तो शब्द रूढ आहे. भामह, उद्भट, रुद्रट या प्राचीन ग्रंथकारांच्या ग्रंथांची नांवेहि 'काव्यालंकार' 'काव्यालंकारसारसंग्रह' काव्यालंकारसूत्रवृत्ति (वामन) अशीच आहेत. पुढें काव्यचर्चेच्या संदर्भांत 'साहित्य' हा शब्द उपयोजिला जाऊं लागला. त्याचप्रमाणें 'काव्यलक्षण' व 'क्रियाकल्प' हे शब्दसुद्धां काव्यचर्चेला लावीत असत. प्रस्तुत ग्रंथकारांनीं या 'शब्दांच्या' व्याप्तीचा व बदलत्या अर्थाचा विचार करून ते शब्द काव्यविषयक विचारांत झालेल्या विकासाचे द्योतक आहेत असें दाखविलें. अलंकार हा शब्द काव्यशोभा किंवा काव्यसौन्दर्य अशा व्यापक अर्थानें प्राचीनकाळीं वापरला जात होता. पुढें त्याची व्याप्ति मर्यादित झाली व फक्त उपमादिकांनाच तो लावला गेला. नाट्यशास्त्रांत पाठ्या-










लंकार, नेपथ्यालंकार, प्रयोगालंकार याबरोबरच ‘काव्यालंकार’ हि आहे. नाट्यकृतींतील सौन्दर्यास ‘काव्यालंकार’ म्हटले आहे. काव्यचर्चा ही प्रथम एक नाट्याचं अंग म्हणून होत असे पुढें काव्यचर्चेची स्वतंत्रपणें दखल घेतली गेली व ‘अलंकार-शास्त्र’ तयार झाले. ‘काव्यलक्षण’ त्या शब्दाचं विवेचनहि या ग्रंथांत फार मार्मिक झालं आहे. ‘काव्यलक्षण’ व ‘काव्यालंकार’ हे दोन्ही शब्द काव्यचर्चेला लावीत असल्यानें जवळ जवळ समानार्थी होतात पण भारताच्या नाट्यशास्त्रांत ‘काव्यलक्षण’ व काव्यालंकार यांत भेद मानला आहे. भरतानें ३६ लक्षणें व ४ अलंकार दिले आहेत. हीं लक्षणें भरतानंतर कोणीहि चर्चिली नाहींत. लक्षणामागील कल्पनाहि भरतानें स्पष्ट केलेली नाहीं. पण हीं लक्षणें अलंकाराशीं फार सदृश आहेत. अलंकारांची लक्षणें ही पूर्वींची (भरताची) लक्षणें होत असें स्पष्ट दिसतें. त्यावरून लक्षणांचें अलंकारांत पर्यवसान झालें असें म्हणतां येते. लक्षणाबद्दल कल्पना येण्यासाठीं अभिनव-गुप्ताची मदत घेतां येते. त्रिविध अभिधा-व्यापार हाच लक्षणशब्दानें संबोधिला जातो असं त्याचं मत आहे. अलंकार तसेंच गुणसुद्धां कविव्यापाराशीं निगडित नसून शब्दार्थाशीं संबद्ध आहेत. हा गुण, अलंकार व लक्षण यांतला सूक्ष्म भेद आवश्यक दृष्टांतांनीं स्पष्ट करण्यांत प्रस्तुत ग्रन्थकारानें (प्रा. देशपाडे) कौशल्य दाखविलें आहे. ‘क्रियाकल्प’ या संज्ञेलाहि असंच म्हणतां येतं. तेव्हा अशा रीतीनें काव्यचर्चेकडे पाहाण्याच्या दृष्टिकोनांत स्थित्यंतरें झाली—विकास झाला हीच गोष्ट क्रियाकल्प—काव्यलक्षण—काव्यालंकार—साहित्य या शास्त्रनामांच्या परंपरेवरून दिसून येतें.

ह्या विकासाचा आढावा घेतांना प्रा. देशपांडे यांनीं प्रत्येक आचार्यानें साहित्य विचारांत जी वैयक्तिक भर घातली व शास्त्राची वाटचाल चालू ठेवली तिचं परिशीलन केलं आहे. प्रत्येकाचे विचार सारांश रूपानें मांडले व उत्तरार्धात त्यांची सखोल चर्चा केली. त्यांना असं दिसून आलं कीं, उद्‌भटानें गुणवृत्तीवर विशेष भर दिला आहे तर वामनानें ‘रीतिरात्मा काव्यस्य’ असें म्हणून काव्यचर्चेला पुष्कळच पुढें नेलें आहे. वामन गुणांना काव्याचे नित्यधर्म मानतो व अलंकारांना अनित्यधर्म मानतो. आधुनिक अभ्यासकांनीं वामनानें काव्यचर्चेत टाकलेली अभिजात भर दुर्लक्षिली व त्याच्यावर अन्याय केला. प्रा. देशपांडे यांनीं वामनकालीन परिस्थितीचा अभ्यास करून त्याचें स्थान ठरविलें. वामनानंतर रुद्रटानेंहि रसचर्चेत विकास घडवून आणला. पण साहित्यचर्चेचा उत्कर्ष यापुढेंच होता. तो आनंदवर्धनानें गाठला. ध्वनिकारानें साहित्यशास्त्रांत क्रांति घडवून आणली. ध्वनिकाराची ही महनीय उपपत्ति प्रस्तुत ग्रंथांत केवळ अकरा मुद्यांत अत्यंत विशद करून मांडली आहे. “कवि अमुख्यवृत्तीचा आश्रय घेतो त्यामागें त्याचें प्रयोजन असते. तें प्रयोजन व्यंग्य असतें. आपलें प्रयोजन परिणामित्वानें अभिव्यक्त करण्याकरतांच कवि वक्रोक्तीचा आश्रय करतो. व्यंग्यार्थाचें अत्यंत सुंदर रूप म्हणजे रस होय. रसाभिव्यक्ति करणाऱ्या शब्दार्थशक्तीलाच ‘व्यंजना-व्यापार’ असें म्हणतात.” ध्वनिकारानीं



# दोहोंचाहि अधिकाधिक अभ्युदय होवो !

महाराष्ट्र आणि गुजरात या नव्या राज्यांचें आम्ही सहर्ष अभिनंदन करतों व त्यांना शांती, सुवत्ता लाभून त्यांचा अभ्युदय होवो अशी इच्छा प्रदर्शित करतों !

दि प्रिमियर ऑटोमोबाइल्स् लि.
मुंबई

हीं व अशी अपूर्व मतें त्या काळांत साहित्य-शास्त्राच्या अनेक प्रश्नावर भरपूर प्रकाश टाकणारी होती. ध्वनिकाराचे विचार अभिजात व प्रबळ होते इतके कीं यापुढील साहित्यचर्चा ही त्यांच्या भोंवतींच गुंफली गेली. त्याच सुमाराच्या दोन शतकांतील कांहीं ग्रंथकार ध्वनितत्त्वाचे विवेचक निघाले तर कांहीं विरोधक. मुकुल, भट्टनायक, माहिमभट्ट, कुन्तक इ. विरोधक होते. भट्टतौत, क्षेमेन्द्र, अभिनवगुप्त व मम्मट यासारख्या ध्वनिकाराच्या अनुयायांनीं कविरसिकमुखानें काव्याचें विवेचन केलें. राजशेखर कुन्तक आणि भोज यांनीं काव्याचे कविव्यापारमुखानें विवेचन केलें. प्रस्तुत ग्रंथांत या सर्व ग्रंथकारांच्या मतांची छाननी केली आहे. अशा रीतीनें नाट्यशास्त्रकारांपासून तो जगन्नाथापर्यंत झालेल्या साहित्यशास्त्रांत झालेल्या विकासाची संगति प्रा. देशपांडे यांनीं लावून दाखवली आहे.

या ग्रंथांत त्यांच्या धारणाशक्तीचा व चिकित्सक बुद्धीचा प्रत्यय वाचकाला पदोपदीं येतो. त्यांचा साहित्यशास्त्रावरचा अधिकार फार मोठा आहे. पण तरीहि अशी नवीन उपपत्ति विद्वानांसमोर मांडतांना त्यांना अविरत बौद्धिक श्रम घ्यावे लागले. ही वर उल्लेखिलेली संगति लावत असतांना त्यांना त्या त्या काळांतील वाङ्मयीन परिस्थितीचा अभ्यास करावा लागला. साहित्यशास्त्रांतील कालानुरूप वाटणाऱ्या विविध पारिभाषिक संज्ञांना वा शब्दांना जी वेगवेगळी व्याप्ति मिळाली अथवा जो भिन्न अर्थ मिळत गेला तोहि फार मोठ्या प्रमाणांत विचारांत घ्यावा लागला. हें केल्यामुळेंच त्यांना विकासाचे टप्पे हेरतां आले. याउलट साहित्यशास्त्राच्या प्रचलित अभ्यासकांनीं संप्रदाय मानले व त्यामुळें त्यांची दृष्टि एका विशिष्ट मर्यादेपर्यंत दूषित झाली. प्रस्तुत लेखकानें (देशपांडे) मात्र साहित्यशास्त्राच्या या विकासक्रमाचा अभ्यास सांप्रदायिक मह्राचा स्पर्श होऊं न देतां केला. व त्यामुळेंच हा ग्रंथ तोलाचा आणि मोलाचा झाला आहे. या संदर्भात त्यांनीं भामहाविषयीं घेतलेली भूमिका व त्याच्या विचारांचा खरा अर्थ सांगण्यासाठीं घेतलेले परिश्रम पाहिल्यास शंका उरण्याचें कारण नाहीं. त्यांना साहित्यशास्त्राच्या कोणत्याही आचार्यांचें सांप्रदायिक धोरण स्वीकारल्याचें आढळलं नाहीं व संप्रदायग्रंथांतल्याप्रमाणें कुठेंहि त्यांना दुराग्रहाचा वास आला नाहीं. पूर्वाचार्यांनीं दिलेल्या ज्ञानानें पुष्ट होऊन त्यावरून पुढें साहित्य कल्पनांचा सांगोपांग विचार करावा—अशा सत्यशोधनाच्या प्रांजळ व निगर्वी भूमिकेतून उत्तरकालीन आचार्यांनीं साहित्यशास्त्राची वाढ केली, भिन्न भिन्न मतं मांडली व साहित्यावरचा विचार अधिक सूक्ष्म केला असं प्रा. देशपांडे यांना दिसून आलं आणि त्यामुळेंच त्यांनीं साहित्य-चर्चेच्या विविध अवस्थांचं मार्मिक निर्देश न करून त्या विकासांतील सातत्य व संगति दाखविण्यांत यश मिळवलं !

या ग्रंथाच्या उत्तरार्धांत लेखकानें म्हटल्याप्रमाणें साहित्यशास्त्रावरच्या सर्व सिद्धांतांचा परामर्श घेतला आहे, व वाचकांना त्यांचा परिचय करून दिला आहे. हा परिचय सामान्य वाचकाला आकलन करण्यास तितकासा सोपा नाहीं. भाषा मराठी असली तरी विषय शास्त्रीय आहे शिवाय प्रस्तुत लेखक ज्या वेगानें धावतो आहे तो वेग वाचकाला पेलवणारा नाहीं. वाचून झालेला विषय डोक्यांत स्थिर न झाल्यामुळें बऱ्याच ठिकाणीं वाचकाच्या मनांत चर्चेतील विविध गोष्टींची सरमिसळ होण्याचा संभव आहे. म्हणून कांहीं वेळेला या ग्रंथावर 'दुर्बोध' अशी टीका केली जाते परंतु ती वस्तुस्थिति नाहीं. दुर्बोधता वाटतच असली तर तो लेखकाचा दोष नसून वाचकाच्या शास्त्राभ्यासाचा अभाव व सुकुमार मतित्वाचा परिणाम आहे.

ह्या भागांत प्रत्येक विषयाची चर्चा लेखकानें अगदीं सखोल केली आहे. ध्वनीची मीमांसा करतांना—त्याचे विविध अर्थ, त्याचा आलंकारिकांनीं केलेला भिन्न संदर्भातला उपयोग, त्याचे संलक्ष्यक्रम, रसादिध्वनि इत्यादि भेद, ध्वनिकारांचा ध्वनीचा अर्थ, रसादिध्वनीचेहि पुनः पृथक् भेद, त्याची व्याप्ति व व्युत्पत्ति, ध्वनिकडे पाहाण्याच्या इतर सर्व आचार्यांचा दृष्टिकोन, ध्वनिविचाराच्या उत्पत्तीची पार्श्वभूमि व साहित्य-शास्त्रावर झालेला परिणाम, त्याचा रस, लक्षणा, शब्दार्थ, अलंकार, लक्षण इत्यादिशीं असलेला संबंध व त्या संबंधांवरचीं आचार्यांचीं विविध मतें—या सर्व गोष्टींचें साग्र विवेचन केलें आहे. महत्त्वाच्या प्रत्येक काव्यांगांचा असा सांगोपांग विचार करून आपला अभिप्राय देण्याची पद्धत या ग्रंथांत अवलंबिली आहे. 'रसप्रक्रिया' व 'रसविषयक कांहीं प्रश्न' या दोन प्रकरणावर दृष्टी टाकल्यास त्याची सत्यता पटेल. ही पद्धत सुगम असून विषयाचं पूर्णत्व साधतें. वरील प्रकरणांच्या आधारें या ग्रंथाचं दुसरं वैशिष्ट्य प्रतीत होतं. तें वैशिष्ट्य हें कीं या ग्रंथांत सर्व काव्यांगावरची [illegible] सर्व आचार्यांचीं (एक किंवा दोन नव्हे) मतें एकत्रित केली आहेत, त्यांच्या छटा स्पष्ट केल्या आहेत. त्यामागील हेतूंचा कयास बांधला आहे व त्यांची योग्यायोग्यता ठरविण्याचा साधार प्रयत्न केला आहे. या कारणास्तव हा ग्रंथ 'संदर्भग्रंथ' म्हणून फार महत्त्वाचा ठरतो.

हा उत्तरार्ध वाचल्यानंतर साहित्य-शास्त्राची वाढ, त्याची सखोलता किंवा सूक्ष्मत्व व त्याचं वैविध्य सामान्याच्याहि लक्षांत आल्याशिवाय राहाणार नाहीं. सबंध अलंकारशास्त्राचा, त्याच्या विकासाच्या अवस्थांचा अर्थ लावीत आढावा घेणारा व सबंध शास्त्राचा सांगोपांग, तर्कशुद्ध आणि समर्पक परिचय करून देणारा—असा हा एकमेव ग्रंथ आहे व तो मराठीला लाभला ही भाग्याची गोष्ट आहे. ● ●

'शिवशक्ति' हा लेख पुणे नभोवाणी केंद्राच्या सौजन्यानें प्रसिद्ध होत आहे.

## कै. डॉ जयवंतराव वर्दे

दीपावलीचे हितचिंतक, मुंबईतील एक लोकप्रिय डॉक्टर श्री. जयवंतराव वर्दे हे रविवार ता. ३।४।६० रोजीं दुपारीं बॉम्बे हॉस्पिटलमध्यें निधन पावले. मधुमेहाच्या जोडीला रक्तदाब आणि किडनीचा विकार यांची भर पडून त्यांचा आजार विकोपास गेला व उपायांची शर्थ होऊनहि दुर्दैवाने ते ऐन उमेदींत कालवश झाले. मृत्युसमयीं त्यांचें वय ४६ वर्षांचें होतें.

सुस्वभावी, मनमिळाऊ, परोपकारी इत्यादि गुणांमुळे फार मोठा मित्रपरिवार त्यांच्या भोंवतीं गोळा झाला होता. एक निष्ठावंत साहित्यप्रेमी ऐन तारुण्यांत नाहींसा झाला. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखांत आम्हीं सहभागी आहोंत.

परमेश्वर त्यांच्या आत्म्यास सद्गती देवो.

# महाराष्ट्रांतील बंदरांचा विकास

रस्ते हे जर उत्कर्षाचे राजपथ असतील तर बंदरें ही त्यांची द्वारें होत. समुद्र, रेल्वे, रस्ते व अंतर्गत मार्ग यांना जोडणारा हा महत्त्वाचा दुवा आहे. देशाच्या सुरक्षितेच्या दृष्टीनें बंदरांना विशेषच महत्त्वाचें स्थान आहे. आपल्या राज्याला अदमासें ३२० मैल लांबीचा समुद्र किनारा लाभला असून, या भागांत वाहतुकीला योग्य अशा खाड्या व बंदरें आहेत. मुंबई हें आंतरराष्ट्रीय महत्त्वाचें बंदर असून, ते मोठ्या जहाजांतून मालाची चढउतार करण्यासाठीं अतिशय सोयीचे आहे. या किनाऱ्यावर एकूण ४९ बंदरें आहेत. यांपैकीं कांहीं बंदरांत बोटी धक्क्यापर्यंत येण्याच्या सोयी नाहींत, तसेंच, त्या बंदरांतून २० ते २०० टन एवढ्या मालाची चढउतार करता येते.

मोरणा, करंगा, दाभोळ, जयगड, रत्नागिरी, मालवण व वेंगुर्लें हीं बंदरें मालाच्या वाहतुकीच्या दृष्टीनें महत्त्वाची आहेत. वेंगुर्लें या बंदरांतून सरासरी १ लक्ष टन मालाची वाहतुक होते. मोरणा या बंदराचा क्रमांक त्यानंतर लागतो. या बंदरांतून ४६,००० टन मालाची वाहतूक केली जाते. इतर बंदरांतून साधारणतः २०,००० ते ३३,००० टन या दरम्यान मालाची वाहातूक होत असते. संगमेश्वर व खारेपाटण या दोन शहरांचा व्यापार अनुक्रमें जयगड व विजयदुर्ग या बंदरांमार्गें चालतो. आणि हीं बंदरें बारमाही असून, त्यांत २०० टन एवढी मालवाहू जहाजें येऊं शकतात. तसेंच रत्नागिरी, देवगड, मालवण व वेंगुर्लें हीं महत्त्वाची बारमाही बंदरें आहेत. किनाऱ्यालगत पश्चिमघाट समुद्र पट्टीला लागूनच पसरला असून सबंध भाग हा रस्त्यांनीं जोडलेला आहे.

दाभोळखाडी ही वाशिष्ठी नदी समुद्राला जेथे मिळते तेथपासून चिपळूणपर्यंत ३० मैल लांब आहे. सध्या. २७ मैलावर असलेल्या गोवलकोटा या गांवापर्यंत १५० टनाची जहाजें येऊं शकतात. लहान बोटी मात्र चिपळूणपर्यंत जाऊ शकतात. कोयना योजनेच्या पहिल्या टप्याचें बांधकाम पूर्ण झाल्यानंतर नदीला फार मोठ्या प्रमाणांत पाण्याचा पुरवठा होईल. पाण्याचा सतत पुरवठा झाल्यामुळें. ही खाडी चिपळूणपर्यंत वर्षभर वाहतुकीला उपयोगी पडूं शकेल.

देवगड हें बंदर रत्नागिरीच्या दक्षिणेस ४० मैलावर देवगड खाडीच्या मुखाशीं वसलेले आहे. देवगडची खाडी ३५ मैल लांब असून देवगडनंतर ती निमूळती होत जाते. समुद्राला जेव्हां फार भरती येते तेव्हां या खाडीमध्यें १६ मैल दूर असलेल्या खर्डा या गांवापर्यंत लहान बोटी येऊं शकतात.

रेडी हें बंदर वेंगुर्ल्याच्या दक्षिणेस रेडी खाडीच्या मुखावर व मुंबई-गोवा यांच्या सरहद्दीवर वसलेले आहे. येथील लोखंडाची निर्यात करण्यासाठीं नुकताच या लहान बंदरावर धक्का बांधण्यांत आला आहे.

स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी, या लहानसहान बंदरांकडे लक्ष देण्यांत आले नाहीं. आणि त्यामुळें या बंदरांची स्थिति अतिशय खालावली.

कुलाबा व रत्नागिरी या जिल्ह्यांतील लहान लहान बंदरें हीं बंदरालगतच्या भागांना विशेष महत्त्वाची आहेत. कारण त्यांचा उपयोग मुंबईला मालाची व प्रवाशांची वाहातूक करण्यासाठीं होत असतो. या जिल्ह्यामध्यें किनाऱ्याजवळून रेल्वेचा मार्ग जात नसल्यामुळें, सडकांनीं प्रवास करणें गैरसोयीचें व खर्चाचे आहे. या दृष्टीनें या लहान बंदरांच्या विकासाचे एक विशिष्ट महत्व आहे. रत्नगिरी, दाभोळ, हर्णे, मालवण व देवगड या पांच बंदरांतून दरवर्षी ५.५० लक्षाहून अधिक संख्येंत उतारुंची वाहतूक होते.

सर्व बंदरांचा विकास एकाच वेळीं करणें शक्य नाहीं कारण बंदरांसाठीं लागणाऱ्या सामानाच्या किंमती वाढल्या आहेत. त्यामुळें कांहीं निवडक अशा बंदराच्या विकासाचीं कामें हातीं घेणें शक्य आहे. या किनाऱ्यावरील दोन किंवा तीन बंदरांच विकास करून त्यांना आपण मध्यम प्रतीच्या बंदरांचा दर्जा प्राप्त करून दिला व बाकीच्या बंदरांना [illegible] आवश्यक असलेल्या थोड्या सोपी जरी उपलब्ध करून दिल्या तरी या बाबतींत आपण चांगली कामगिरी बजावली. असें होईल. या उद्देशानें सरकारने गेल्या वर्षीच्या कोंकण विकासाच्या १ कोटी रु. खर्चाच्या कार्यक्रमाखालीं ४० लक्ष रु. ची जादा तरतूद केली होती. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या अवधीं कार्यान्वित करण्यासाठीं ६२ लक्ष रु. खर्चातच एक खर्चाचा जादा कार्यक्रम आंखण्यांत आला होता.

रत्नागिरी हें कोंकणाचें महत्त्वाचें बंदर होय. अविकसित अवस्थेंत असतांनाहि या बंदरांत दररोज ५०० उतारुंची वाहतूक होत असते. बंदराच्या मानानें ही वाहतुक उल्लेखनीय असून सदर बंदरांतून प्रतिवर्षी २२,०२५ टन मालाचीही वाहातूक होते. परंतु हे बारमाही बंदर नाहीं. पावसाळ्यांत जहाजांची वाहातूक बंद पडते. मुंबईच्या दक्षिणेस मंगलोरपर्यंत ( गोवा प्रदेश सोडून ) एकही बारमाही बंदर नाहीं. रत्नागिरी बंदराला बारमाही बंदराचें स्वरूप प्राप्त करून देण्याबाबतच्या प्रश्नावर राज्य सरकार व भारत सरकार विचार करीत आहे.

बंदराच्या विकासाच्या कार्यक्रमानुसार मालवण येथील आर. सी. सी. धक्का व श्रीवर्धन येथील धक्क्याचें काम पूर्ण झालें असून त्या कामाचा उल्लेखनीय कार्यामध्यें समावेश करतां येईल. एलिफंटा येथील धक्क्याचें बांधकाम, बोरिया येथील बोट धक्क्याचे बांधकाम, रत्नागिरी बंदरांत प्रवाशांला उतरण्याच्या सोयी उपलब्ध करण्याचें काम व रेवदंडा येथील निमूळत्या धक्क्याचें बांधकाम चालू आहे.

महाराष्ट्रांतील बंदरांच्या विकासार्थ पहिल्या पंचवार्षिक योजनेंत या कार्यासाठीं ३ लक्ष रु पेक्षां कमी खर्च करण्यांत आला होता त दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या पहिल्यां तीन वर्षांच्या अवधीमध्यें ह्या कामासाठीं ३० लक्ष रु. खर्च करण्यांत आला. भारत सरकारने मध्यम प्रतीच्या बंदरांची मोठ्या प्रमाणांव विकास करण्यासाठीं योग्य बंदरांची शिफारस करण्यासाठीं मध्यमप्रतीच्या बंदरांची विकास समिति स्थापन केली आहे. यानुसार ह्या समितीने आपल्या चौकशीच्या कार्यक्रमांत रत्नागिरी, रेडी, इत्यादि ठेकाणांना भेटी दिल्या आहे व या समितीचा अहवाल लवकरच बाहेर पडेल. तसेंच कोंकण किनाऱ्यावरील बोट वाहतुकीच्या संपूर्ण समस्येची चौकशी करण्यासाठींहि भारत सरकारनें एक समिती स्थापन केली आहे.

• •



अनुक्रमणिका

(पान ६६ वरून चालू)

मध्यम वर्गीय सुख-दुःखें

## तिळा उघड

गेली कांहीं वर्षें मराठी वाङ्मयांत नवकथेचा फार मोठा बडिवार माजला. नवकथेच्या चाललेल्या उदो उदोमुळें अनेक तरुण लेखक भ्रष्टकथा लिहूं लागले आणि मराठी कथेंत विकृत अशीं आवर्तें निर्माण झालीं. या आवर्तापासून आपल्याला दूर ठेवून निर्भयपणें जिवंत कथालेखन करणारे जे तरुण कथाकार आहेत त्यांत 'तिळा उघड' या कथासंग्रहाचे लेखक श्री. शं. ना. नवरे यांचा अवश्य उल्लेख करावयास पाहिजे. अलीबाबा आणि चाळीस चोर या अरबी कथेंतील नायकानें तिळा उघडल्यावर अमूल्य रत्नांचा खजिना दिसला तर शं. ना. नवरे यांनीं ही तिळा उघडून मध्यम वर्गीयांचे दैन्य दारिद्य आणि पिचलेल्या आशाआकांक्षा याचें भेदक दर्शन घडविलें आहे. संग्रहांतील तिळा उघड, उद्याची गोष्ट, हरून अल् रशीद सारख्या वैचित्र्यपूर्ण कथांमागें लेखकाला निश्चित कांहीं सांगायचें आहे हें प्रतीत होतें. श्री. नवरे यांची शैली प्रसन्न, धांवती आणि मुलायम आहे. मध्यमवर्गीयांच्या जीवनांतील बारीक खुपणाऱ्या खांचाखोचा त्यांनीं सूक्ष्मतेनें टिपल्या आहेत. पण त्यांत कडवटपणा नाहीं किंवा उन्मत्तपणा नाहीं. एक प्रकारचा मनमोकळा आत्मविश्वास आणि धिटाई त्यांच्या लेखणींत आहे. श्री. नवऱ्यांचा अद्भुतरम्यतेकडेहि थोडा कल आहे. पण अशा विचित्र वातावरणांत वाचकाला नेतांना ते आपला मूळचा पिंड विसरत नाहींत. काकाच्या धाकट्या भावानें सांगितलेली गोष्ट, व्यंकटेश सदाशिव, या कथा म्हणजे अतृप्त आशांचें वैचित्र्यपूर्ण दर्शन. नवरे, कुटुंबकथा लिहिण्यांतहि प्रवीण आहेत. पण त्यांच्या कुटुंबकथांत रडवेपणा नाहीं, किंवा भाबडेपणा नाहीं. झोंप, लक्ष्मी या कथा या दृष्टीनें वाचनीय आहेत. त्यांत नवऱ्यांची काव्यात्म वृत्ति जागृत झाली आहे, पण कुटुंबकथेपेक्षांहि नवरे निरागस प्रेमकथा फार चांगल्या लिहितात. 'परिमिता' या कथेंतील विषय आतां पर्यंत अनेकांनीं हाताळला आहे. आणि त्यामुळेंच याच विषयावर नवऱ्यांनीं एक चटका लावणारी ऋजु कथा लिहिली हें विशेष.

नवरे यांची लेखनशैली धावती आणि मोहक आहे. मोजक्या शब्दांत सुटसुटीत चित्र डोळ्यासमोर उभें करण्यांत ते कुशल आहेत. ते कशाचीहि उधळपट्टी करीत नाहींत. एकाद्या कंजूष मारवाड्याप्रमाणें आपल्याकडील अनुभवांचा खजिनाहि जपून उधळतात. अर्थात् त्यामुळें नवऱ्यांच्या चित्रिकरणाला कांहीं मर्यादा पडल्या आहेत. भावनेची तार ससकाला नेण्याचें सामर्थ्य असणारी कथा या संग्रहांत नाहीं. कायमची हुरहुर लावील आणि बराच काळ विषण्ण करील अशी करुण कहाणी यांत नाहीं. पण श्री. नवरे मनांत आणतील तर हें नक्की करूं शकतील. अजूनहि रेखीव लिहिण्याकडे त्यांचा कल आहे. मोजून मापून अनुभवांचे दर्शन घडविण्याचा संवय आहे. त्यांनीं स्वतःला थोडें बेबंद करावें म्हणजे पु. भा. भावे यांच्यासारख्या अंतःकरणाचा वेध घेणाऱ्या सामर्थ्यशाली कथा ते लिहितील.

—अरविंद पाटेकर





